शरद्-साहित्य माला—८

# गांव-गंगा

[ डॉ० शरच्चन्द्र चतर्जी याच्या मूळ बंगालीवरून ]

: अनुवादक :

भा. वि. वरेरकर

किमत २ रुपये

:: प्रकाशक ::

भारत प्रकाशनसंस्था, गिरगांव, मुंबई ४.

# गांव-गंगा

## १

मुखर्जींच्या वाड्यातल्या आतल्या चौकात वेणी घोषालने पाऊल टाकताच त्याला समोरच एक वयस्क बाई दिसली. तिला पहाताच तो उद्गारला, " अरे वा, मावशी ! रमा कुठं आहे ? "

मावशी आपल्या रोजच्या आन्हिकात गुतलेली होती. तिने सैंपाकघराकडे बोट दाखविले. वेणी सैंपाकघराच्या उबरठ्याबाहेर येऊन उभा राहून म्हणाला, " तर मग रमा, पुढ काय ठरवलस ? "

चुलीवर सळसळणारे आधण उतरून ठेवीत रमा वर पाहून म्हणाली, " कशाबद्दल दादा ? "

वेणी म्हणाला, " तारिणीकाकाच्या श्राद्धाबद्दल बोलतो आहे. रमेश तर कालच येऊन हजर झाला. मोठ्या थाटात बापाच श्राद्ध करावयाचा त्याचा विचार दिसतोय जायच का ? "

आश्चर्याने डोळे वर करून रमा म्हणाली, " तारिणी घोषालच्या घरी मी जाणार ? "

वेणी थोडासा ओशाळला आणि म्हणाला, " त माहीत आहे मला काही झाल तरी तुम्ही लोक तिकडे जाणार नाही हें खर पण तो पोर घरोघर जाऊन प्रत्येकाला आमंत्रण देतो आहे असं कळल—बदमाषपणांत बापसे बेटा सवाई दिसतो. तेव्हा म्हटल, आला इथ तर त्याला काय उत्तर देणार ? "

रमा रागाने उत्तरली, " काहीच बोलायची नाहीं मी. दरवान देईल त्याला उत्तर. "

पूजेत गुतलेल्या मावशीच्या कानी हे गोड शब्द गेले. भाषण तिला एकंदरींत आवडले. पूजा टाकून ती उठून आली. रमाच्या तोंडचे शब्द सपतात न संपतात तोंच सळसळलेल्या आधणासारखी उसळून ती म्हणाली, " दरवान कशाला ?

माझ तोंड कुठं गेलय ? मेल्याला अस उत्तर ऐकवीन, की जिवात जीव असेपर्यंत बेट्याला मुखर्जीच्या घराकडे बघायची छाती व्हायची नाहीं. तारिणी घोषालाचा कारटा आमच्या घरीं येणार का आमत्रण द्यायला ? काहीं विसरले नाहीं मी वेणीमाधव. याच मुलाबरोबर आमच्या रमाचं लग्न लावून द्यायचा तारिणीचा बेत होता तेव्हा माझा यतिन जन्मला नव्हता त्याला वाटल अशा रीतीन यदू मुखर्जीची सारी दौलत घशात घालीन म्हणून. समजलास का वेणी ? ते काही साधल नाही. तेव्हा त्यानीं भैरव आचार्याला गाठलं जपतप आणि जारणमारण काहीं तरी केल. लग्न होऊन सहा महिने गेले नाहींत तोच पोरीच्या कपाळाच कुंकू पुसून गेल असली करतुत केली मेल्यानं ! यदू मुखर्जीच्या मुलीशी सोयरीक जुळविणारा हा कमजात ! तेव्हाच हे अस मरण आल मेल्याला—मुलाच्या हातून अग्निसुद्धा मिळाला नाही. आग लागली मेल्याच्या तोंडाला ! " कुस्ती संपल्यासारखी मावशी धापा टाकू लागली

पुन. पुनः कमजातीचा उल्लेख ऐकताना वेणीचा चेहरा उतरत होता. तारिणी घोषाल त्याचा चुलता. रमेच्या ते ध्यानी आलें. मावशीला दटावीत ती म्हणाली. " उगीच कुणाची जात कशाला काढतेस मावशी ? जात काही कुणाच्या हातची नाही. ज्याची त्याची जात ज्याला त्याला मोठीच "

वेणी ओशाळून थोडासा हसत म्हणाला, " नाही रमा, मावशीच म्हणण बरोबर आहे तूं एवढ्या मोठ्या कुलीनाची मुलगी--आमच्या घराशी कशी सोयरीक होईल तुमची ? अस म्हणणच काकाना शोभत नव्हतं. अन् हे जारणमारणाच सागितल ना, ते देखील खरच आहे. भैरव आचार्य नि आमचे काका— काय करतील अन् काय न करतील हे सागता आल नसत कुणाला. अन् आता हा भैरव झालाय आमच्या रमेशाचा वडील माणूस ! "

मावशी म्हणाली, " ते तर साऱ्यानाच माहीत आहे रे वेणी दहा बारा वर्षं हा पोर काही गावीं आला नव्हता होता कुठं इतके दिवस ? "

" ते कस सागू मावशी ? तुमच न काकाच जेवढ सख्य तेव्हढच माझ. मुबईला का कुठसा होता म्हणतात. कुणी म्हणतात डॉक्टरची परीक्षा पास झालाय. न. कुणी म्हणतात वकील होऊन आलाय- कुणी म्हणतात कशातच काही नाही— साऱ्याच थापा ! दारुड्या आहे लेकाचा. घरी आला तेव्हा रानड्यासारखे तावडे लाल डोळे करून आला होता. "

' म्हणतोस काय ? मग तर त्याला सावलीला सुद्धा उभं करता नये '

वेणीबाबूला जरा आवेश आला मानेला हिसडा देऊन तो म्हणाला, नयेच मुळीं ! काय रमा, रमेशाची आहे का आठवण ? '

आपल्या वैधव्याची हकिकत निघाल्यामुळे रमा मनातल्या मनात चुरून गेल्यासारखी झाली होती. ती तशीच लाजत हासत म्हणाली, " आहे तर ! माझ्यापेक्षा काही तो फारसा मोठा नाही. शाळेत आम्ही दोघही बरोबरच होतों. पण फार आठवण येते ती त्याच्या आईची गेली बिचारी काकू ! फार लोभ होता तिचा माझ्यावर "

मावशी एकदम उसळून उठून थयथय नाचत म्हणाली, " आग लागली मेलीच्या लोभाला ? लोभ म्हणे !—स्वार्थ साधायचा कावा सगळा. कुठून तरी पोरीला हाताखाली घालायचा डाव होता त्याचा '

गोष्ट पटल्याचा आव आणून वेणीबाबू म्हणाला, " त्यात तर शकाच नाही मावशी. धाकट्या काकुचं असं होतं—"

पण एकदम मधेच तोंड घालून रमा मावशीला म्हणाली, " त्या जुन्या गोष्टी आता हव्यात कशाला मावशी ? "

रमेशाच्या बापाच्या बाबतीत रमेचा कितीही द्वेष असला तरी त्याच्या आई-बद्दल रमेच्या अतःकरणात कुठेतरी झाकलेला जिव्हाळा होता. इतके दिवस गेले तरी तो जिव्हाळा पूर्ण नाहीसा झाला नव्हता.

एकदम होकार देत वेणीबाबू म्हणाला, " अगदी खरं ! अगदी खरं ! धाकटी काकू मोठ्या घरची बायको होती. अजूनही तिची आठवण आली, की माझी आई डोळ्यातून टिपं टाकते—"

गोष्टी भलत्याच बाजूला झुकताहेत असे पाहून मूळ विषयावर येण्यासाठी वेणीबाबू म्हणाला, " तर मग हे ठरलंच ! बदल व्हायचा नाही ना ? '

रमा हंसली. म्हणाली, " दादा, बाबा म्हणत, अग्नि ऋण आणि शत्रु याचा भरवसा कधी धरू नये. जिवंत असेपर्यंत तारिणीबाबूंन आम्हाला काही कमी त्रास दिला नाही–बाबाना तुरुंगात घालायचा डाव टाकला होता त्यानं–ते मी विसरले नाहीं बरं दादा ! जिवात जीव आहे तोवर विसरायची नाही. त्या वैऱ्याचा मुलगा हा रमेश. दुसरं काहीं नातंच लावता येत नाही त्याखेरीज. बाबानीं सारी इस्टेट आम्हा दोघा भाऊबहिणींत वाटून दिली आहे खरी पण

तिच्या राखणीचा सारा भार टाकला आहे माझ्यावर. आम्ही तर नाहींच—पण ज्याचा म्हणून आमच्याशीं संबध आहे—त्यांना सुद्धा जाऊ देणार नाही." थोडा विचार करून ती म्हणाली, "असं पहा दादा, त्याच्या घरी कुणा ब्राह्मणान मुळींच जाऊ नये असं करता येईल का?"

जरा पुढे सरकून आवाज उतरून वेणीबाबू म्हणाला, "तेच तर चाललंय ना? तू आमच्या बाजूला असलीस की आम्हाला कसलीच काळजी नाहीं. या कुवापुरातून रमेशाला घालवून दिलं नाहीं तर माझ नांव वेणी घोषालच नव्हे. मग मी आहे अन् तो भैरव आचार्य आहे आता तारिणीबाबू हयात नाहीत काही त्याची राखण करायला."

रमा म्हणाली, "रमेश आहे ना त्याचा पाठीराखा? असं पहा, दादा मी हे सांगून ठेवते, वैर साधायला तो देखील माग घ्यायचा नाहीं."

वेणीबाबू जरासा पुढे झाला, इकडे तिकडे नजर फेकून चौपाईवर उकीडवा बसला आणि आवाज अगदीं खाली आणून म्हणाला, "रमा, बाबू वाकवून घ्यायचा असेल तर हीच वेळ, जुनावला तर मग जमायचं नाही, हें सांगून ठेवतोय. धनदौलत राखायची कशी हे अजून त्याला कळल नाहीं. अशा वेळींच वैऱ्याची पाळमुळ उखडून टाकली नाहींत तर पुढ काहीं करता यायच नाहीं अहर्निश एवढच ध्यानात ठेवलं पाहिजे की हा तारिणी घोषालचा मुलगा —बस्स एवढच!"

"त मला कळतय वेणीदादा!"

"तुला कळायच नाही तर कुणाला? मुलगा घडवायला म्हणून ईश्वरान हातीं घेतलं आणि चुकून तुला मुलगी करून बसला बुद्धीच्या बाबतीत एकादा पक्का जमीनदार सुद्धा तुझ्यापुढ हात टेकील, असं मी रोज म्हणतोंच. ठीक. उद्या एकदा येऊन जाईन. आता उशीर झाला—" असं म्हणून वेणीबाबू उठला.

या स्तुतीन फार खूष होऊन रमा उठून उभी राहिली आणि मोठ्या आदबीनें काहीं तरी बोलायला सुरवात करणार होती तोंच तिच्या काळजांत एकदम धडकी भरली. आंगणाच्या पलीकडून कुणा अपरिचित शब्दाची गंभीर हाक ऐकू आली, "राणी कुठ आहे रे?"

रमेशाची आई लहानपणीं तिला याच नांवान हाक मारीत असे. इतक्या दिवसात ती तें विसरून सुद्धां गेली होती. वेणीबाबूकडे तिन पाहिलं तों त्याचे तोंड गोरेमोरे झालेलें तिला दिसून आलें—तोंच कोरडें माथे, अनवाणी पाय,

धोतराचा सोगा डोक्यावर फेकलेला रमेश येऊन उभा राहिला. वेणीबाबू नजरेत येतांच तो म्हणाला, " अरे वा दादा! तुम्ही इथच ? चला ना. आपल्याशिवाय कोण आहे तिथं! सारा गावभर धुडाळीत फिरतों आहें. अन् राणी कुठ आहे?" असे म्हणत तो दारासमोर येऊन उभा राहिला. जाणे शक्य नाही असे पाहून रमा खाली मान घालून तिथेंच राहिली. क्षणभर तिच्याकडे पहात—आश्चर्यचकित झालेला रमेश एकदम म्हणाला, " अरेच्या! हीच तर ती! केव्हढी मोठी झालीस ग! खुशाल आहेस ना?"

रमा तशीच मान खाली घालून उभी होती तिच्या तोंडून चट्कन् शब्द बाहेर फुटेना, रमेश हंसत हसत म्हणाला, " ओळखलं नाहीस मला? मी तुझा रमेश दादा."

अजूनही डोळे वर करून पहाण्याचा धीर होत नव्हता. तिने हळूच प्रश्न केला, " खुशाल आहात ना आपण?"

" हा! खुशाल आहे. पण मला 'आपण' का म्हणतेस रमा?—" वेणीबाबूकडे पहात खिन्नपणे हंसत तो म्हणाला, " रमेचे ते शब्द मी केव्हांसुद्धा विसरणार नाहीं दादा. आई जेव्हा वारली तेव्हा ही अगदींच लहान होती. पण त्या वयात सुद्धां किती मायाळू होती! माझे डोळे पुसून म्हणाली होती, 'रमेशदा, रडू नकोस. माझी आई आपण दोघ जण वाटून घेऊं.' आता आठवत नसेल ते रमा! नाहीं? बर ठीक. माझ्या आईची तरी आठवण आहे?"

त्याचे हे भाषण ऐकताच रमा अगदीं शरमिंदी झाली. तिची मान आणखी झुकली. काकूची सारखी आठवण येत असे, अस एकवार मान हलवून सांगणे सुद्धां तिच्याकडून घडले नाही.

रमेश जरी सर्वसाधारणपणे बोलत होता तरी विशेषतः रमेलाच उद्देशून बोलण्याचा त्याचा रोख होता. तो म्हणाला, " आतां वेळ राह्यला नाहीं. तीन दिवसावर आल आहे. आतां जे काही करायचं ते तुम्हा लोकानींच केलं पाहिजे. मी हा असा सर्वस्वी निराधार आहे म्हणून तुमच्या दारीं येऊन उभा राहिलोंय. तुम्ही कुणी तरी आल्याशिवाय काही सुद्धां व्हायचं नाही माझ्या हातून—"

मावशी गुपचुप येऊन रमेशच्या मागे राहिली. वेणीबाबू आणि रमा रमेशच्या बोलण्याला उत्तर देत नाहींत असं पाहून ती समोर आली आणि रमेशच्या नजरेला नजर भिडवून म्हणाली, " कोण रे तूं? तारिणी घोषालचा मुलगा ना?,'

रमेशने पूर्वी या मावशीला पाहिले नव्हते. तो गाव सोडून निघून गेल्यानंतर रमेशची आई जेव्हा आजारी पडली त्यावेळीं ही मुखर्जीच्या घरात घुसली ती बाहेर निघाली नाहीं. आश्चर्यचकित होऊन रमेश तिच्याकडे नुसता पहात राहिला. मावशी बोलत होती, " दिसतच आहे. नाहीं तर एवढा बिनअक्कल पुरुषमाणूस दुसरा कोण असणार ? जसा बाप तसा बेटा ! सांगितल नाहीं, सवरल नाही, एकदम गृहस्थ माणसाच्या घरात शिरून दंगा करायला शरम नाहीं वाटत तुला ?"

रमेश अगदी सुन्न झाला. नुसता ताठ होऊन पहात राहिला.

" जातो मी ! " असे म्हणून वेणीबाबू घाईघाईने तिथून सटकला. खोलीतूनच रमा म्हणाली, " काय बडबडतेस मावशी, जा ना आपल्या कामाला ! "

मावशीला वाटलें, भाचीने आपलें झाकलेलें इंगित ओळखलें. तेव्हा आवाज आणखी चढवून — शब्दात थोडे आणखी विष कालवून ती म्हणाली, "बडबडत नाहीं रमा, यावेळी कसं वागायला हव ते मी जाणते. तुझ्यासारखी लाज शरम दाखवायला नको मला. असा घाबरून कशाला पळाला तो वेणी ? सरळ सांगायला कशाला भ्यायच, कीं बाबारे आम्ही तुझे गुमास्ते नाहीं, तुझ्या खास जहागिरीची रयत नाही, आम्ही कशाला येतों तुझ्या घरी पाणी भरायला नि कणीक तिंबायला ? तारिणीबाबू मेला— साऱ्या गावाची किरकिर गेली. खर म्हटल, तर हे त्याच्यासारख्या पुरुषान समोरासमोर सांगायच त्याला. पण ते काम माझ्यावर टाकून निघून गेला.

रमेश तसाच ताठ होऊन उभा राहिला होता. अशा प्रकारे आपल्याला उत्तरे ऐकायला मिळतील हे त्याच्या स्वप्नींसुद्धा आले नव्हते. आतून मैंपाकघराच्या दाराची कडी खळकन् वाजली पण कुणीच तिकडे लक्ष दिले नाही. रमेश कांहीच बोलत नाहीं, अगदीं पांढरा फटक पडला आहे असे पाहून मावशी पुनः बोलू लागली, " काही असो, ब्राह्मणाच्या मुलाला चाकरमाणसाकरवीं ओढून काढून अपमान करायचा नाही मला. जरा भानावर ये आणि एक काम कर बाबा—जा इथून. गृहस्था माणसाच्या घरांत शिरून लाडीगोडी लावायला काही कुक्कुबाळ नाहीस ! तुझ्या घरीं आमची रमा पाय धुवायला सुद्धां यायची नाही हे सांगून ठेवते मी ! "

झोपेतून दचकून जागा झाल्याप्रमाणे रमेश एकदम भानावर आला. त्याची

भरदार छाती फोडून असा एक जोराचा निश्वास बाहेर आला, की तो ऐकनाच याचा तोच दचकला. खोलींतून दाराआड उभी राहून रमा डोकावून पहात होती. क्षणभर अनिश्चितपणे थाबून सैंपाकघराच्या बाजूला वळून रमेश म्हणाला, "येणं जर शक्य नाही तर मग उपाय काय? हें सार काहीं मला मुळीच माहीत नव्हत. न कळून मी तुला त्रास दिला त्याची मला क्षमा कर राणी." असे म्हणून तो हळूहळू तिथून निघून गेला.

खोलीतून कांहीच उत्तर आलं नाही. जिची क्षमा मागून तो गेला होता. ती त्याच्या समोर काहीसुद्धा न बोलता त्याच्या दृष्टीआड नुसती पहात राहिली होती हे रमेशला काही कळल नाहीं.

रमेश जाताच वेणीबाबू येऊन हजर झाला. तो निघून गेला नव्हता आड लपून नुसती वाट पहात होता. मावशीची आणि त्याची नजरानजर होताच तो मोठ्या आनदाने उसळून हसू लागला आणि मावशीच्या अगदी जवळ येऊन म्हणाला, 'ऐकवलत खर मावशी! आपल्याला काहीं हे अस बोलायच जमल नसत. ही चाकरनोकराचीं कामं का रमा? मी आडून पहात होतो. अस काळ-ठिक्कर तोड करून बाहेर निघून गेला! वा:! अगदी छान झाल.'

मावशी जरा रागारागाने आवाज चढवून म्हणाली, "छान झाल म्हणे! दोन बायकामाणसाच्या अगावर असल जोखीम टाकून जायच्या ऐवजी स्वतः चार शब्द सुनावले असतेस त्याला, तर जास्त छान झाल असत! बर नाहीं बोलायची छाती झाली, तर समोर उभ राहून मी काय सागते त्याला, ते का ऐकून घेतल नाहीस? असा हळूच बाजूला सटकलास हे बर नाही केलस!"

मावशी बोलत होती तसतसे वेणीबाबूच्या चेहेऱ्यावरचे हसू मावळत जात होते तिच्या रागावर कसे विरजण घालावे याची युक्ति त्याला सुचत नव्हती. फार वेळ त्याला विचार करावा लागला नाहीं. आतून रमेनें एकदम उत्तर द्यायला सुरवात केली—अजूनपर्यंत ती एक शब्द सुद्धा बोलली नव्हती—ती म्हणाली, "तूच बोललीस मावशी तेच कुणापेक्षाही उत्तम झालं. कुणी किती का बोलेना पण इतकं विष जिभेत घालून त्याची फुकर दुसऱ्यावर मारायची तुझ्याखेरीज दुसऱ्याची ताकत नाहीं!"

मावशी आणि वेणीबाबू दोघेंही आश्चर्यानें थक्क होऊन गेलीं. सैपाकघराकडे वळून मावशी म्हणाली, "काय म्हटलस ग?"

" काहीं नाहीं, जपपूजेला बसलीस ती सात वेळ उठलीस. जा ना. एकदा उरकून टाक ना ! काही जेवायच बिवायचं आहे कीं नाही ? " बोलत बोलत रमा स्वतःच खोलीबाहेर आली आणि कुणालाच काही न बोलता ओटीवरून पलीकडे दुसऱ्या बाजूच्या खोलीत निघून गेली. वेणीबाबूचा चेहरा सुकुन गेला होता. त्याने हळूच विचारले, ' काय झालं मावशी ? "

" मला कस कळणार बाबा ? या असल्या राजराणीची मिजास आमच्यासारख्या दासीबटकीना कशी कळावी ? "

सतापान जळफळत, तडफडत हिरवापिवळा चेहरा करून ती पूजेच्या पाटावर जाऊन बसली. मनातल्या मनात तिने देवाच्या नावाचा जप सुरू केला असावा असे वाटले.

वेणी हळहळू निघून गेला.

## २

या कुवापूरच्या इस्टेटीच्या विल्हेवाटीसबधीं जो एक इतिहास आहे तो इथं सागणे अवश्य आहे. सुमारे शभर वर्षापूर्वी बलराम मुखर्जी नावाचा एक महाकुलीन ब्राह्मण आणि त्याचा मित्र बलराम घोषाल असे दोघेही विक्रमपुराहून या भागात आले मुखर्जी नुसता कुलीनच नव्हता तर बुद्धिमानही होता. तिथे येऊन त्यानें लग्न केले, वर्धमान राजदरबारी नोकरी केली. घोषालची सोयरीकही याच बाजूला झाली. पण वडिलाचे कर्ज फेडण्यापलीकडे त्याला कोणतीच ताकत आली नाहीं, म्हणून दुःखांत आणि कष्टांत त्याला दिवस घालवावे लागले.

या लग्नापायींच या दोन दोस्तात बिघाड आला* शेवटी हा वाद इतक्या थराला गेला, कीं एका गावात राहात असतांना देखील वीस वर्षात दोघानीं

* कुलीनपणाचे हे नियम बगाल्यात मोठे कडक आहेत कुलीन ब्राह्मणाने लग्न करताना दुसऱ्या कोणत्याही भिन्न शाखेच्या ब्राह्मणाशीसुद्धा सोयरीक जमवली तर त्याच्या कुलीनतेला बाध येतो आणि त्याला पुनः कुलीनाशीं सबध ठेवता येत नाहीं. बलराम घोषालचे लग्न अशा दोषाला कारणीभूत झाले होते.

एकमेकाचें तोंडसुद्धा पाहिले नाहीं. बलराम मुखर्जी मरण पावला त्या दिवशींसुद्धां घोषालने त्याच्या घरीं पाऊल टाकले नाही.

पण मरणाच्या दुसऱ्या दिवशीं जी बातमी बाहेर आली ती मोठी विलक्षण होती त्यानें आपली सर्व इस्टेट विभागून आपल्या आणि आपल्या दोस्ताच्या मुलात अर्धी अर्धी वाटून दिली होती. तेव्हापासून कुवापूरची इस्टेट मुखर्जी आणि घोषाल हीं दोन घराणीं उपभोगीत आली आहेत

हे दोघेही आपल्याला जमीनदार म्हणवीत आले आणि गावच्या लोकानीही त्याला विरोध केला नाही. ज्या वेळचे हे कथानक आहे त्यावेळीं कुवापूर गावात आणि गावाबाहेर एकच गडबड उडून गेली होती.

मोठ्या पातीचा मुख्य पुरुष वेणी घोषाल घरीं परत आला तो काकाच्या मरणामुळे आतल्या आत समाधानाचा निश्वास सोडितच चुलत्याचे श्राद्ध कशा रीतीनें उधळून लावावे याचा घाट घडवण्यासाठी त्यानें गावच्या गांवांत आपल्या बाजूची मडळी गोळा करायला सुरवात केली. दहा वर्षात चुलत्यापुतण्याची नजरभेट सुद्धा झाली नव्हती. बऱ्याच वर्षांपूर्वी तारिणीबाबूच्या घराचें ' कातार ' झाले होते. तेव्हांपासून त्याने आपला मुलगा रमेश याला त्याच्या मामाकडे पाठवून देऊन घरचा कारभार नोकरचाकराच्या हातीं आणि स्वतःचा कारभार कोर्ट अदालतींत चालवून दिवस कंठायला सुरवात केली होती. रुरकी कॉलेजात बापाच्या मरणाची बातमी पोचताच रमेश उत्तरक्रियेच कार्य साजरे करण्यासाठी काल दुपारी इतक्या वर्षानंतर आपल्या शून्यगृहात येऊन हजर झाला होता.

घरीं गडबड सुरू होती आता फक्त दोन दिवस राहिले होते. गुरुवारीं रमेशाकडे पितृश्राद्ध होतें शेजारच्या निरनिराळ्या गावचे एकेक, दोनदोन वडील माणूस येऊन पोंचले होते पण खुद्द कुवापुरातील कुणीच कां येत नव्हतें ते रमेशला कळून चुकलें होतें—कदाचित् शेवटपर्यंत कुणीच येणार नाही असेही त्याला वाटत होते. फक्त भैरव आचार्य आणि त्याच्या घरची मंडळी येऊन कामाला लागली होती. आपल्या गावच्या ब्राह्मणाची पायधूळ घरी लागणार नाही हे माहीत असूनही रमेशनें सारी व्यवस्था मोठ्या थाटात सुरू केली होती.

आज बराच वेळपर्यंत रमेश घरातल्याच कामात गुंतून होता. सहज बाहेर आला त्यावेळीं त्याला दिसून आले, की एकदोन वृद्ध गृहस्थ येऊन बैठकखान्याच्या बिछायतीवर बसून धूम्रपान करीत होते. समोर येऊन तो कांहीं

बोलणार, तोंच मागून आवाज आला म्हणून त्याने वळून पाहिले एक जख्ख म्हातारा, पाचसहा मुलगेमुली बरोबर घेऊन खोकत खोकत आत आला खांद्यावर एक मळका पत्रा, नाकावर दोरीनें कानावर अडकवलेला एक भला मोठा चष्मा, पांढरे शुभ्र केस, पांढरी शुभ्र मिशी तंबाखूच्या धुरानें तांबूस होत आलेली–अशी ही मूर्ति समोर येऊन आपल्या त्या भल्या मोठ्या चष्म्यातून रमेशाच्या चेहऱ्याकड क्षणभर पाहून कांहींच न बोलता एकदम रडू लागली. तो कोण होता हें रमेशने ओळखले नाही. घाबरून तो पुढे आला आणि त्याचा हात धरू लागला तेव्हा म्हातारा भरलेल्या आवाजान म्हणाला, " नाही रे बाबा रमेश, तारिणीबाबू असा एकदम निघून जाईल अस स्वप्नात सुद्धा वाटल नव्हतं. पण हे चतर्जीच रक्त नव्हे म्हणाव ! खर बोलायला कुणाच्या बापाला नाही भीणार ! आत्ताच वेणी घोषाल भेटला—अगदीं सरळ सरळ सांगितल त्याला—म्हटल, श्राद्धाची एव्हढी थाटाची तयारी रमेशन केली आहे, कीं या बाजूच्या कुणाच्या बापानं सुद्धा पाहिली नसेल—' थोडे थांबून म्हातारा म्हणाला, " हे साले तुझ्या कानाला लागून माझी निंदा करतील पण एक ध्यानात ठेव, हा धर्मदास फक्त धर्माचा दास, दुसर कांहीं ओळखत नाहीं. " असे म्हणून सत्यभाषणाचे सारे पौरुष हजम करीत म्हाताऱ्याने गोविंद गांगुलीच्या हातचा हुक्का खस्कन् ओढला आणि एक जोराचा दम मारून खोकायला सुरवात केली.

धर्मदासने कांहीं अगदीच अतिशयोक्ती केली नव्हती. श्राद्धाचा थाट खरोखरच मोठ्या जोरानें सुरू झाला होता. कलकत्त्याहून हलवाई आले होते ते आंगणाच्या एका बाजूला पक्वान्न तळीत होते. गावचीं पोरे गोळा होऊन त्यांनीं तिथें एकच गर्दी केली होती. गरीबगुरीबाना वस्त्रदान करण्यात येणार होते. चंडीमंडपाच्या एका बाजूच्या व्हरांड्यावर बसून कपड्याचीं ठाणे फाडीत भैरव आचार्य कपड्याच्या राशी रचीत होता. आणि गावचे कांहीं लोक त्याच बाजूला बैठक मारून कपड्याच्या खर्चाचा हिशेब करीत या भलत्या अपव्ययाबद्दल मनांतल्या मनात रमेशला शिव्या देत होते.

ही बातमी कळल्यामुळे दूरदूरचे गरीबगुरीब लोक येऊ लागले होते. इकडचे तिकडचे लोक, गावची रयत, यानीं वाड्यात एकच गर्दी करून सोडली होती. कोण खरोखरच भांडत होते तर कुणी उगीच दंगा माजवित होते. चोंहीकडून होत असलेली खर्चवाढ पाहून धर्मदासाचा खोकला आणखी वाढला.

'नाहीं नाहीं' म्हणत रमेश संकोचाने काहीं बोलत होता पण धर्मदासनें त्याला थांबवले त्याने बोलायला सुरवात केली. तो बरेचसें काहीं बोलून गेला खरा पण खोकल्याच्या जोरामुळे त्यातलें एक अक्षरही कुणाला कळले नाही

गोविंद गांगुली सर्वांपूर्वीच आला होता. खरे पाहिले तर धर्मदास जे बोलला ते बोलण्याची सवड असताना ते आपल्याकडून झालें नाहीं म्हणून तो आपला आपल्यावरच रागवला होता पण आलेली संधि त्याने दवडू दिली नाही. धर्मदासला उद्देशून तो एकदम बोलत सुटला, "काल सकाळी—ऐकलंस धर्मदास दादा, काल सकाळीं, याव म्हणून निघालो पण येण झाल नाही. वेणीनं सारखी टुमणी लावली होती, 'गोविंदकाका, एकदा हुक्का पिऊन जा.' एकदा विचार केला—कशाला जायच? पुनः वाटल, म्हटल, वेणी काय म्हणतो तें तरी पहाव! वेणी काय म्हणाला कळलं तुला रमेश? म्हणाला, 'काका, तुम्ही लोकानी रमेशाची वडीलकी पत्करलीय. पण अस विचारतों. तिथ पगत करणार आहात का?' मी थोडाच त्याला ऐकतोय? तुम्ही मोठे लोक असाल की नसाल, आमचा रमेश काही कुणापेक्षा लहान नाहीं. तुमच्या घरीं कधी कुणाचा हात ओला झाला नाहीं मी म्हटल, 'वेणीबाबू, असा रस्त्यावर ये. कशीं दानें चाललींयत पहा गरीबगुरिबाची कशी बरदास्त होते आहे ती एकदा डोळ्याखालीं घाल' हा रमेश म्हणजे काय. कालचं पोर पण छाती म्हणून म्हणायची असेल तर ही या पोराचीच!' एवढं माझं कय झालं, पण असा थाट काहीं कधीं पाहिला नव्हता. तरी पण धर्मदास, आमच्या हातीं काय आहे? तो जो कोण तिथ वर बसला आहे तो सार काही आमच्या हातून करून घेणार आहे! तारिणीदादा म्हणजे एक शापभ्रष्ट देव होता बर!"

धर्मदासचा खोकला कांहीं केल्या थाबेना. तो आणखी आणखी खोकत होता नव्या तरण्याबाड जमीनदाराला अगदी आपल्या समोर गांगुलीबाबू सुदर सुदर भाषण ऐकवीत असता आपल्याला काहींच बोलता येत नाहीं असे पाहून त्याचा जीव अगदीं व्याकुळ झाला होता.

गांगुली बोलत होता, "तू तर आम्हाला फार दूरचा नाहीस बाबा. हे अगदीं जवळचं नात. तुझी आई म्हणजे माझ्या आतेबहिणीची चुलत बहीण. राधानगरचं बानर्जीच घराण—तें तारिणीदादाला माहीत होतं सार! कसलहि काम असो—दावा मुकदमा असो, साक्षी द्यायची असो, त्यान म्हणायचं गोविंदाला बोलाव!"

असेल नसेल तेवढी शक्ति खर्च करून, खोकला गिळून धर्मदास किंचाळत म्हणाला. " उगीच कशाला गोविंददा ? खो–खो–खो–मला कशाला सागायला हव्यान या गोष्टी ? आता ही साक्ष द्यायची बाब. त्या वर्षी तू म्हणालास, पायात जुनं नाहीं. अनवाणी कसा जाऊ ? ?' खो–खो !—तारिणीन झटकन् अडीच रुपये टाकून बूट आणून दिला तुला. ते तारिणीचे बूट घालून गेलास आणि वेणीच्या बाजूची साक्ष देऊन आलास ! खो–खो !––"

ताबडे लाल डोळे करून गोविद म्हणाला, " मी साक्ष दिली ? "

" हो, हो ! तू ! "

" खोटा कुठला ! "

" खोटा तुझा बाप ! मोडकी छत्री उगारून ताडकन् उडी मारून गोविद उठला, " तर रे साल्या,––" हातातली काठी उगारून धर्मदास काही बोलणार होता तोंच त्याचा खोकला मोठ्या जोराने सुरू झाला. घाबरून रमेश दोघांच्या मधे येऊन त्याना दूर लोटू लागला, हातची काठी मारणार तोच धर्मदास खोकत खालीं पडला आणि म्हणाला, " साला म्हणे ! नातंच आहे तें ! साल्याचा दादा मी ! साल्याची अक्कल तर पहा––"

" साल्याचा दादा काय ! " अस म्हणत असता गोविद गागुली छत्रींत अडकुन बाजूला पडला

मंडप उभारायला आलेलीं शहरचीं माणसे काम टाकून धावत आलीं. कुठे ना कुठें तरी काम करीत असलेला प्रत्येक माणूस धावतच तिथें आला.–– सभोंवार ही गर्दी गोळा झाली. खेळ टाकून पोरेबाळेसुद्धा मजा पाह्यला आलीं. आणि ह्या या सर्व लोकासमीर आश्चर्यचकित झालेला रमेश स्तब्ध उभा होता. कसे वागावें हें त्याला सुचत नव्हते. त्याच्या तोंडून एक शब्दसुद्धा बाहेर फुटत नव्हता

काय हें ? दोघेही वयोवृद्ध !––सभ्य माणूस–ब्राह्मण कुळातले !––एवढ्या यःकश्चित् गोष्टीसाठीं हलकटासारखी भाषा यानीं वापरावी का ? कपड्याची ठाणे फाडीत व्हरड्यावर बसलेला भैरव सारे काहीं पहात होता. ऐकत होता. तो चटकन् उठून येऊन रमेशला म्हणाला, " चारएकशें कपडे फाडून झाले. आणखीं पाहिजेत का ? "

रमेशच्या तोंडून चटकन् उत्तर येईना. रमेशाची गाळण उडालेली पाहून भैरव हसला. अगदीं शांतपणें म्हणाला, " हें काय गागुलीबाबू ? तुमच्या

या वागण्यान आमचे बाबूजी थक्क होऊन गेलेयत. पाहिलत ना ? काही वाईट वाटायच कारण नाही बाबूजी. इथ हे असच चालायच. वाड्यावर मोठे समारभ असले, कीं ही अशीच दंगल व्हायचीच. एकमेकाचीं टाळकीं सुद्धा फोडतात—पण एका क्षणात पुनः एक होतात. चला, इकडे या चतर्जीबाबू. आणखी ठाण फाडायला हवी आहेत का ? एकदा पहा ना."

धर्मदासच्या तोंडून उत्तर यायच्या पूर्वीच मानेला झटके देत गोविंद गांगुली मोठ्या उत्साहाने उभा राहून म्हणूं लागला, "तेच तर ! तेच तर ! हे असच चालायच. हे अस झाल्याशिवाय का मोठी कामं होतात ? शास्त्रातच म्हटलय, लाख भाडण झाल्याशिवाय लग्नकार्य पुर होत नाही. गतसालची आठवण आहे ना तुला भैरव ? यदू मुखर्जीची मुलगी रमा—तिच्या वटपौर्णिमेच्या व्रताच्या दिवशी राघव भट्टाचार्य आणि हरि चतर्जीनी एकमेकाचीं डोकी फोडली होती. आठवत ना ? पण माझ ऐक भैरवभय्या, बाबूजीच हें करण आपल्याला आवडत नाहीं. या हलक्या लोकाना वस्त्रदान करण आणि भस्मात तूप ओतण सारखच. त्यापेक्षा चार ब्राह्मण बोलावून आणावे, त्याना वस्त्रं द्यावीं, त्याच्या मुलाना द्यावीं—मोठा नावलौकिक होईल मी म्हणतों बाबूजी, हे अस केल पाहिजे. कस धर्मदास ? "

सारखी मान हालवीत धर्मदास म्हणाला, "गोविंदाच्या म्हणण्यात काहीं तथ्य आहे बाबूजी. या हलकट शूद्राना हजार कपडे दिलेत तरी नावलौकिक व्हायचा नाही. 'हलके लोक' म्हणून का म्हणतात याना ? समजलास ना बाबा रमेश ? "

एव्हांपर्यंत रमेश स्तब्ध राहिला होता. गरिबाना वस्त्रदान करण्याच्या बाबतींतली त्याचीं बोलणीं त्याच्या मनाला लागली. युक्तायुक्ततेचा प्रश्न नव्हता—पण ज्याना हे 'हलके लोक' म्हणून म्हणत होते त्या आजूबाजूला गोळा झालेल्या हजारों माणसासमक्ष आताच त्यानीं आपल्या अकलेचं जे प्रदर्शन केले होते ते पाहून त्याला वाईट वाटले होते. त्या वर्तनाबदल त्याना एवढीसुद्धा लाज वाटली नाहीं, याचीच त्याला चीड आली होती. उत्तराची अपेक्षा करीत भैरव उभा आहे असे पाहून रमेश थोडक्यात म्हणाला, "आणखी दोनशे वस्त्र तयार ठेवा."

"तेच तर मी म्हणत होतों. भैरवभय्या, चल. मी येतों तुझ्या मदतीला. एकट कसं झेपेल हे काम तुला ? " असे म्हणून कुणाच्या संमतीची अपेक्षा न करतां गोविंद गांगुली कपड्याच्या राशीजवळ जाऊन बसला.

रमेश घरात जायला निघाला होता. धर्मदासाने त्याला एका बाजूला बोलावून घेतले आणि अगदीं हलक्या आवाजात त्याच्याशीं बोलायला सुरवात केली. कापड फाडीत असता तिरप्या डोळ्यांनीं गोविंद गांगुली बघत होता—उत्तराचार दाखल रमेश होकारार्थी मान हालवून आत निघून गेला.

" कोण आहे रे ? बाबाजी कुठ आहेत रे ? " असे म्हणत एक मिशी काढलेला रोडका म्हातारा आत आला. त्याच्याबरोबर तीन मुले होतीं. मुलगी सर्वांत मोठी होती ती मुलगी जाडी भरडी फाटकी साडी नेसली होती. दोघेही मुलगे नुसते लंगोटी लावलेले होते. त्याच्या अंगावर एक चिंधोटी सुद्धा नव्हती. त्याची हाक ऐकून सर्वांनीं वर पाहिले.

स्वागत करीत गोविंद म्हणाला, " याव दिनूदादा, याव, बसावं. मोठं भाग्य आहे आमच—आज पायधूळ लागली तुमची इथ. मुलगा बरा झाला ना ?—मग तुम्हीं—"

हे एव्हढे डोळे करून धर्मदास गोविंदाकडे पाहू लागला त्याच्याकडे ढुंकून सुद्धा न बघता तो म्हणाला, " काय हे ? इकडे फिरकला सुद्धा नाहींत दादा ? "

गोविंदानं म्हाताऱ्याच्या हातीं गुडगुडी दिली. जळलेल्या तंबाखूचे उगीच दोन तीन दम मारून दिनूभटजी खालीं बसून म्हणाला, " मी इथं होतों कुठ बाबा !—तुझ्याच बायकोला आणायला तिच्या माहेरी गेलो होतों ना ? बाबूजी कुठ आहेत ? मोठं अवडंबर घातलय म्हणून ऐकतोंय रस्त्यातून येताना ऐकल, गांवच्या बाजारात लोक बोलत होते—लहान मोठ पाहिल नाही—सर्वांना खूप खायला घातलं म्हणे ! अन् जाताना सोळा सोळा पुऱ्या न् चार जोड्या संदेश प्रत्येक लहानमोठ्या माणसाला दिले म्हणे ! "

खाकरून घसा साफ करीत गोविंद म्हणाला,—" शिवाय वर एकेक वस्त्र ! असा आहे आमचा रमेशबाबू. कुणान् कुणाच्या तरी वाडवडिलांच्या पुण्याईन सार काहीं साजर होऊन जातं—-पण वेणीबाबूचे डोळे फुटताहेत ना ! दोन माणसं पाठविलीं होतीं त्यानं माझ्या घरी. माझी एक गोष्ट सोडून द्या म्हणा,—रमेशचान् आमचा झगदी रक्ताचा संबंध—पण हे आमचे दिनूदादा,—हे धर्मदास दादा,—बाबा, हे काय सोडून जाणार आहेत तुम्हाला ? नुसत रस्त्यात कळल अन् हे दिनूदादा धावत आले. अरे ए षष्टीचरण, तंबाखू भरून आण ना. बाबा रमेश, जरा इकडे येऊन जा पाहू. काहीं सांगायचं आहे. " हळूच रमेशला एका

बाजूला घेऊन गोविंद त्याच्या कानाला लागून विचारूं लागला. " आत धर्मदासची बायको आलीय वाटतं ! सावध हं सावध. असलं काहीं करू नको बाबा. हा म्हातारा भट कसाही असो, भाबडा आहे—पण त्याची बायको !—तिच्या हातात कोठीची चावी देऊ नको ह बाबा. तेव्हढ करू नकोस. कणीक, तूप, तेल, मीठ, अर्धं लाबवील तुला कशाला त्याची काळजी ? आता जाऊन तुझ्या मामीला पाठवून देतो. कोठीचा ताबा तिनं घेतला की एका मोहरीच्या दाण्याची सुद्धा अफरातफर व्हायची नाहीं. "

नुसत ' होय ' म्हणून रमेश उगी राहिला. तो थक्क होऊन गेला होता. धर्मदासने गुप्तपणे सागितलेल्या बातमीचा गोविदाला कसा सुगावा लागला ?

लंगोटी लावलेली दोन्ही पोर दिनूदादाच्या गळी पडत म्हणूं लागलीं, " बाबा मला लाडू हवे आहेत. "

एकदा रमेशकडे आणि एकदा गोविदाकडे पहात दिनूभट म्हणाला, " लाडू कुठून आणू रे ? "

" का बर–ते आहेत ते ! " अस म्हणून त्यानीं हलवायाकडे बोट दाखविले.

" आम्हाला पण हवेत दादा—" अस म्हणत रडत रडत आणखी दोन तीन मुले धावत येऊन धर्मदासच्या गळीं पडलीं.

' ठीक आहे, ठीक आहे,' म्हणून रमेश अस्वस्थ होऊन पुढे आला.

" अस पहा, लवकर उठून मुल इतक्या लाब आली आहेत. उपाशीं असतील. अरे कोण रे, काय तुझ नाव—ते लाडवाचं ताट आण इकडे."

आचारी लाडवाची थाळी घेऊन न येतो तोंच पोरांनीं त्याच्यावर झडप घातली. वाटून द्यायला सुद्धा अवकाश दिला नाहीं. मुले खाताहेत असे पाहून दिनूभटजीच्या कोरड्या डोळ्याना ओलावा आला. आशाळभूत नजरेनें पहात दिनूभट म्हणाला, " अरे ए पोरा, लाडू खाल्लेस ना ? कसे काय झालेयत लाडू !"

" छान आहेत बाबा ! " अस म्हणून मुलानीं चाब्या सुरू केला.

गोड गोड हंसत मान हलवित दिनूभट म्हणाला, " हा, तुझीच पसंती ती ! गोड झाल की झालं ! कायरे आचारी, ती कढई का उतरलीस खालीं ? अन् कायरे गोविदभय्या, अजूनही ऊन बरच वर आहे—नाहीं रे ? "

इकडे तिकडे न पहाता आचारी म्हणाला, " आहे तर काय—अजून खूप वेळ आहे. अजून सध्याआन्हिक व्हायचंय—"

" तर मग असं पहा, गोविंदभय्याला दे ना एक लाडू. तुम्हीं कलकत्त्याचे आचारी–कसे काय पकवता तें बघूं दे ना त्याला. छे छे छे ! मला कशाला ? तरी पण अर्धा चालेल—अर्धाच हं ! जास्त नको. अरे षष्टीचरण, थोडं पाणी आण बर बाबा. जरा हात धुवून टाकतो."

रमेश म्हणाला, " घरातून आणखिन् चार थाळे घेऊन ये षष्टीचरण."

धन्याचा हुकूम होताच तीन चार थाळ्या मिष्टान्न आणि पाण्याचें ग्लास हजर झाले. मलेरियानें रोडावलेल्या त्या महाब्राह्मणानें पक्वान्नावर हात मारायला सुरवात करून पहातां पहातां अर्धीअधिक थाळी खाली केली.

" हां ! कलकत्त्याचे हलवाई आहेत खरे. कसं धर्मदासदादा ? " असे म्हणून दिनूभटजीनें कोंडलेला श्वास जोराने सोडून दिला. धर्मदासाचे खाणे अजून सपले नव्हते. त्यामुळे खात असलेल्या लाडवाची जिभेवर रुळणारी गोडी बाजूला लोटून कोरडे शब्द त्याच्या तोंडावाटे येणे शक्य नव्हतें. एकदरींत असे दिसून आलें कीं या बाबतीत त्याचा मतभेद नव्हता.

" हा ! हातात खुमारी आहे खरी ! " असे म्हणून सर्वांच्या शेवटीं गोविंद-बाबूंनीं हात धुतले. मोठ्या अदबीनें हलवाई म्हणाले, " एवढी तसदी घेतलीत भटजीमहाराज, तसाच एवढ्या जिलब्या चाखून पहा ना ! "

" जिलब्या? कुठ आहेत ? आण पाहूं. "

जिलब्या आल्या. एवढे लाडू पचवल्यावरसुद्धा दुसरे पक्वान्न येतांच त्यावर सुद्धां ताव मारण्याची त्या लोकांची ताकत पहात रमेश स्तब्धपणें उभा राहिला होता. दिनूभटजीने आपल्या मुलीला हात पुढे करायला सागून म्हटले, " अग ए खेंदी, ह्या घे पाहू दोन जिलब्या. "

" आता नाहीं जायच्या त्या बाबा. "

" जातील, जातील ! एक घोट पाणी पिऊन घसा ओला करून घे ना ! भूख मेली आहे न् दुसर काय ? नाहीं खाववल्या तर पदराला बांधून घे अन् उद्यां सकाळीं खा ! वा वा बाबूजी, याला म्हणतात पक्वान्न ! अमृतच जसं कांहीं ! छान—छान झालं ! पक्वान्न दोन केलींत वाटतं बाबूजी ? "

रमेशला बोलावें लागले नाहीं. हलवाई मोठ्या खुषींत येऊन म्हणाले, " नाहीं जी, रसगुल्ला आहे, मोहनभोग आहे—"

" आ ! मोहनभोग ? मग ते कुठ बाहेर काढले नाहींस ते ? "

आश्चर्यचकित रमेशाच्या तोंडाकडे बघत दिनूभटजी म्हणाला, " राधानगरींत बोसांच्या घरीं एकदा खाल्ले होते खरे. अजून जीभ शिवशिवतेय. तुम्हाला खर वाटायचं नाहीं बाबूजी, पण मोहनभोग मला फार फार आवडतात. "

रमेशनें हसून नुसती मान हलवली. असल्या चमत्कारावर अविश्वास करणें मुळींच शक्य नव्हतें. कसल्या तरी कामासाठीं राखाल बाहेर जात होता त्याला हाक मारून रमेश म्हणाला, " आत आचार्य आहेत ना ?—त्याना म्हणावं, थोडे मोहनभोग इकडे पाठवून द्या. "

साजवेळा उलटून गेली होती तरीही ते ब्राह्मण मोहनभोगाच्या आशेने ठाणें माडून बसले होते.

राखाल बाहेर येऊन म्हणाला, "आज आतां कोठी खोलायची नाहीं बाबूजी.–"

रमेशला राग आला तो म्हणाला, " मी मागतोय म्हणून साग. "

रमेशला राग आला आहे असा अदाज करून गोविद गांगुली मारे डोळे गरगर फिरवीन म्हणाला, " भैरवाची अक्कल पाहिलीस दिनूदा ? आईपेक्षा मावशीच जास्त मायेची म्हणतात ते हेच. म्हणूनच मी म्हणतों—"

तो काय म्हणतो ते न ऐकता राखाल म्हणाला, " आचार्य तरी काय करतील ? त्या घरच्या काकू येऊन त्यानीं कोठीला टाळं लावलंय. "

धर्मदास आणि गोविंद दोघेही दचकून उठून म्हणाले, " कोण ? मोठी काकू ? "

आश्चर्यचकित होऊन रमेशने विचारले, " काकू आल्यायत ? "

" जी, आल्याबरोबर त्यांनीं लहानमोठ्या दोन्ही कोठींच्या खोल्यांना कुलपं लावून टाकलीं ! "

रमेशला आश्चर्य वाटलें—आनंदही झाला. कुणाचे काहीच बोलणे ऐकण्याची अपेक्षा न करतां तो एकदम घरांत निघून गेला.

## ३

" काकू ! "

हाक कानीं पडतांच कोठीतून विश्वेश्वरी बाहेर आली. वेणीबाबूच्या वयाशीं तुलना करतां त्याच्या आईचे वय निदान पन्नास तरी असले पाहिजे होतें, पण दिसण्यात ती चाळिसांपेक्षां जास्त वयाची दिसत नव्हती.

रमेश सारखा पहात राहिला. अजूनही तीच सोन्यासारखी काती. एका काळीं तिच्या सौंदर्याची या भागात मोठी ख्याती होती. अजूनही तिच्या देहाला त्या निर्दोष सौंदर्यानें सोडले नव्हते. डोक्याचे केस कापून आखुड केले होते. त्यातल्या एकदोन बटा तिच्या कपाळावर रुळत होत्या. हनवटी, गाल, ओठ, ललाट, सारी जशींकाहीं एकाद्या कलाकाराने मोठ्या कुशलतेने घडवलेलीं. सर्वापेक्षा कुणाच्याही नजरेत भरत असत ते तिचे दोन डोळे त्या नजरेला नजर दिल्यावर क्षणभर कुणाच्याही अत.करणाला चटका लागल्यावाचून राहात नसे.

या काकूंचे रमेशवर फार प्रेम होते—विशेषतः रमेशच्या परलोकवासी आई-बद्दल तिला मोठा जिव्हाळा होता. तरुणपणीं ज्यावेळीं त्याना मुले झाली नव्हती—सासू आणि नणदेच्या छळाला त्रासून ज्यावेळीं दोघीही चोरून आसवे गाळीत होत्या —तेव्हापासून हा पहिला लोभाचा जिव्हाळा उत्पन्न झाला होता. त्यानतर विभक्तपणा, कोर्टखटले, दोन घरें करणे, किती प्रकारच्या किती भानगडी त्या दोघींच्या ससारात उत्पन्न झाल्या भाडणाच्या त्रासामुळे स्नेहाचें बधन ढिलें होऊ लागले —पण ते मुळींच तुटून गेले नाहीं.

किती तरी वर्षांनीं ती धाकट्या जावेच्या कोठींत आली होती. तिच्याच हातानें सजवलेली ती जुन्या भाड्याकुड्याचीं कोठी पाहून काकूच्या डोळ्याना झर्कन् पाणी आलें. रमेशची हाक कानी पडताच डोळे पुसून ज्यावेळी ती बाहेर आली त्यावेळीं लाल झालेल्या तिच्या डोळ्यांकडे पहाताना रमेश क्षणभर आश्चर्यचकित होऊन स्तब्ध राहिला. काकूला त्याची-कल्पना आली—म्हणूनच, नुकताच पितृहीन झालेल्या रमेशकडे पहाताना, तिचें हृदय भरून आलें. अतरातला भाव त्याला दिसू नये म्हणून तिने आपल्या मनाला बाध घातला—इतकेच नव्हे, तर ती उलट हसून म्हणाली, “ ओळखलस ना रमेश ? ”

रमेशच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. त्याची आई स्वर्गवासी झाल्या दिवसा-पासून तो आपल्या मामाच्या घरी जाईपर्यंत काकूनेच त्याला आपला म्हणून वाढविला. तिनें त्याला मुळीच दूर केलें नव्हते तेही त्याला आठवले. त्या दिवशी तो त्या घरीं गेला तेव्हा काकू घरीं नाही म्हणून सागितले म्हणूनच तिची भेट-सुद्धा झाली नव्हती. रमेशच्या घरीं वेणीबाबूंच्या समोर आणि वेणीबाबू गेल्यावर त्याच्या मावशीनें ज्या अतिशय निर्दयपणानें त्याला वागवलें होते त्यावरून या गावीं आपले म्हणायला आपलें कुणी नाहीं असे त्याला वाटले होते.

विश्वेश्वरी रमेशच्या तोंडाकडे क्षणभर पहात राहिली आणि म्हणाली " छे बाबा, अशा वेळीं मन घट्ट केल पाहिजे. "

तिच्या आवाजात कोमलतेची एव्हढीसुद्धां छटा नव्हती. रमेश आपल्याशीच सावध झाला. राग दाखवण्याची जी जागा नाहीं तिथे रुसून बसण्यासारखी दुसरी विटंबना नाहीं हे त्याला पटले तो म्हणाला, " मी मन घट्टच केलंय काकू. म्हणूनच स्वतःला झेपेल तेवढं करतों आहें तुम्हीं कशाला आलात उगीच ? "

काकू हसली आणि म्हणाली, " हा कसला जाब विचारतोस ? तूं काहीं मला बोलावून आणल नाहींस. पण मी सांगून ठेवते, सार कामधाम उरकेपर्यंत कोठींतून कोणताही जिन्नस बाहेर जायचा नाहीं. जायच्यावेळी कोठीची चावी तुझ्याकडे देईन आणि उद्या परत येईन तेव्हा तुझ्याकडून घेईन दुसऱ्या कुणाच्या हातीं चावी द्यायची नाही काय रे, त्या दिवशी तुझा दादा भेटला होता ना तुला ? "

प्रश्न ऐकून रमेशाचे मन द्विधा झाले. मुलाचे उपद्व्याप तिला माहित होते कीं नाहीं याची त्याला अटकळ नव्हती. थोडा विचार करून तो म्हणाला, " दादा त्यावेळीं घरी होता कुठ ? "

प्रश्न केला तेव्हाच काकूच्या चेहऱ्यावर उद्वेगाची छाया आली होती. रमेशच्या या उत्तरानें तिचा चेहरा प्रसन्न झाला हे त्याला स्पष्ट दिसून आलें. हसत हंसत मोठ्या वात्सल्याने ती म्हणाली, " आता काय सांगायचं तुला ? असा कसा तूं ? भेटला नाहीं तर पुनः नको का यायला ? असा कसारे तू ? तुझ्याबद्दल त्याला तेवढसं बर वाटत नाहीं हे मला माहीत आहे, पण तुझ्या परीन तूं वागलं पाहिजेस. तुला बर वाटेल ते तू कर. किती झालं तरी तो तुझा वडील भाऊ आहे. त्याच्या समोर पड खायला तुला वाईट वाटायला नको. शिवाय ही अशी प्रसंगाची वेळ बाबारे, अशा वेळीं लोकाचे हातपाय धरून मीटमाट करायला काही लाज वाटायला नको. माझा सोन्या तो ! जा–पुन: एकदा जा. तो घरीच असेल यावेळी. "

रमेश उगीच राहिला. तिच्या या आग्रहाचा उद्देश त्याला चांगलासा कळला नाहीं किंवा त्याच्या मनातला संशयही दूर झाला नाहीं. आणखी जरा जवळ येऊन विश्वेश्वरी हलकेच म्हणाली, "बाहेर जे बसले आहेत त्याना मी तुझ्यापेक्षा चांगलीच ओळखते. त्याच ऐकूं नकोस. माझ्याबरोबर एकदा येऊन तुझ्या दादाची भेट घे. "

नकारार्थी मान हलवीत रमेश म्हणाला, " नाहीं काकू, ते होणं नाहीं. बाहेर जे बसले आहेत ते कसेही असोत, कुणाही पेक्षा ते मला जास्त आपले आहेत–"

तो आणखी कांही बोलणार होता पण तितक्यात त्याची नजर काकूच्या चेहऱ्याकडे गेली. आश्चर्यचकित होऊन तो गप्प राहिला, चारी बाजूला पडणाऱ्या संध्याकाळच्या छायेपेक्षांही काकूचा चेहरा काळवडला होता. जरा थाबून एक मोठा निश्वास सोडून ती म्हणाली, " टीक काहे, जशी तुझी मर्जी. त्याला भेटायचच नाहीं म्हणून तुझं ठरलय, मग त्या बाबतींत बोलण्यात काय अर्थ आहे ? कसंही असो तूं कांहीं काळजी करू नकोस बाबा ! कुठं कांहीं कमी पडायच नाही भल्या पहाटे मी येईन—" असे म्हणून विश्वेश्वरीनं मोलकरणीला हाक मारली आणि तिला बरोबर घेऊन ती हळूहळू बाहेर निघून गेली. वेणीबाबूबरोबर रमेशची काहींना कांहीतरी खिटफिट झाली आहे असे तिला वाटले. ती ज्या रस्त्यानें गेली तिकडे पहात रमेश काहीं क्षण स्तब्धपणे उभा राहिला.

तशाच उतरल्या चेहऱ्यानें तो जेव्हा बाहेर आला तेव्हां गोविंद व्यग्र होऊन म्हणाला, " बापूजी, काकू आल्या आहेत ना ? "

" रमेश म्हणाला, " हो ! "

" कोठीला कुलूप लावून चावी घेऊन गेल्या म्हणून ऐकलं ! "

रमेशने मानेनेच होकार दिला,—कारण एव्हढेच, बोलणें झालें होते तरी ती शेवटी जाताना काहीं तरी ठरवून कोठीची चावी घेऊन गेली होती.

गोविंद म्हणाला " पाहिलस धर्मदासदा ? मी म्हणत होतों ते हेच. मतलब आला का ध्यानात बाबूजी ? "

मनातल्या मनांत रमेशला खूप सताप आला पण परिस्थिति पाहून तो सहन करून स्वस्थ राहिला. दिनूभटजी अजूनही गेला नव्हता. त्याला वेळ काळ काहीच कळत नसे. मुलाबाळांसह पोटभर मिष्टाने ज्याच्या कृपेने खाल्ली त्याला अतःकरणपूर्वक चार आशिर्वाद देऊन सर्वांच्या समोर खड्या आवाजात त्याच्या सात पूर्वजाचीं स्तुतिस्तोत्र गायल्याशिवाय तो केव्हाही घरीं गेला नसता. अगदीं साहजिकपणे तो म्हणाला, " तिचा मतलब कळण कठीण का आहे बाबा ? दुसऱ्या कुणाच्या हातात कोठी जाऊ नये म्हणूनच ना ती चावी घेऊन गेली ? तिला सार काहीं माहित आहे. "

गोविंदाला राग आला. त्या भोळवटाच्या भाषणाने सतापून उठून त्याला धमकी देऊन तो म्हणाला, " कळत नाहीं, सवरत नाही, मग उगीच मधें तोंड कशाला घालतोस ? या बाबतींत तुला काय कळतंय म्हणून बोलायला निघालास ? "

धमकी मिळाल्यामुळे दिनूभटजीचा मूर्खपणा आणखी फुलून उठला. तोहि जरा गरम होऊन म्हणाला, " यांत समजायचं काय आणि सांगायचं काय ? स्वतः येऊन काकूंनीं कोठीला कुलूप लावून चावी नेली तें कळलं ना तुला ? तिला नको कोण म्हणणार ? "

सतापानें चिडून गोविंद म्हणाला, " आता घरीं जा पाहूं भटजी. आला होतास ते काम झाल. कच्चींबच्चीं घेऊन यथास्थित ताव मारलास. आता आणखी काय ? मोहनभोग परवां खा. आज कांहीं मिळत नाहींत. आतां जा– आम्हाला खूप काम आहेत."

दिनू लाजेने अगदीं शरमिंदा झाला. रमेश तर अगदीं संतापून उठला होता. गोविंद आणखी काही बोलणार होता तोंच रमेशचे कठोर शब्द त्याच्या कानीं पडले, " तुम्हाला काय झालंय गांगुली महाशय ? ज्याचा त्याचा निष्कारण कशाला अपमान करता ? "

त्या धमकावणीसरशीं गोविंद पहिल्यानें थोडासा आश्चर्यचकित झाला पण लगेच अगदीं रुक्षपणे हसत म्हणाला, " कुणाचा अपमान केला बाबूजी ? मी सांगतों आहे ते अगदी बरोबर आहे कीं नाहीं ते यालाच विचारा ना ! तो रस्त्या-रस्त्यातून फिरत असला तर मी गल्लीकुचींतून फिरतों आहे म्हणाव. पाहिलास धर्मदासदा ? दिनूभटजीचा दिमाख पाहिलास ?—"

धर्मदासनें काय पाहिले ते त्याचे त्यालाच माहीत, पण या माणसाचा निर्लज्ज-पणा आणि मत्सर पाहून रमेश मात्र थक्क होऊन गेला. रमेशकडे वळून दिनू स्वतःच म्हणाला, " नाहीं बाबा, गोविंद म्हणतो ते खर आहे. सर्वांना माहीत आहे, कीं मी एक दरिद्री माणूस आहे याच्यासारखा जमीनजुमला, शेतकुणगा काहीं माझ्याकडे नाहीं. कसाबसा माणूस पाहून भीक मागून मी पोट भरतों आहें. पोराच्या तोंडी दोन गोड घांस घालायची ताकद काहीं देवानं दिली नाही—तेव्हां मोठ्याच्या घरीं काहीं कार्य निघाल तरच त्यांना कांहीं खायला मिळणार. अगदीं मनाला लावून घेऊं नकोस बाबा. तारिणीदादा हयात होता तेव्हा मला मुद्दाम बोलावून खायला घालीत होता. म्हणून म्हणतो, आज अगदीं पोट भरून इथून खाऊन जातो आहें तें पाहून स्वर्गात त्याच्या आत्म्याला समा-धान वाटेल. एवढं तुला नक्की सांगून ठेवतों."

पहातां पहातां दिनूभटजीच्या दोन्ही डोळ्यांतून टपाटप आसवें गळून सर्वां-

समक्ष खालीं पडलीं. रमेश तोंड फिरवून उभा राहिला. आपल्या फाटक्या उपरण्यानें डोळ्यांतलीं आसवें पुसून दिनू म्हणाला, " नुसता मीच नव्हे बाबा, माझ्यासारखे या बाजूचे किती तरी दुःखी गरीब जीव तारिणीदादाच्या पुढ हात पसरायला आले आणि विन्मुख होऊन गेले अस कधींच झाल नाहीं पण हे किती लोकांना माहित आहे ! उजव्या हातान दिल तर त्यान कधी डाव्या हाताला पत्ता लागू दिला नाही. आता तुम्हाला मुळींच त्रास देत नाही चल पोरी खेदी, उठ—हरिधन, चल बाबा घरी जाऊ आता. उद्या सकाळीं येऊ पुनः ! आणखी काय बोलूं बाबा रमेश, बापासारखा हो—दीर्घजीवी हो."

रमेशला गहिंवर आला होता. तो बोलत बोलत त्याच्या बरोबर निघाला—म्हणाला, " भटजी महाराज, हे दोनचार दिवस माझ्यावर जरा कृपादृष्टी ठेवा. बोलायला सकोच वाटतो तरीही सागतों, की या घरी हरिधनच्या आईची पायधूळ झाडली गेली तर मी माझ मोटं भाग्य समजेत."

रमेशचे दोन्ही हात आपल्या दोन्ही हातात दाबून धरून भटजी अगदीं स्फुदत स्फुदत म्हणाला," आम्हीं मोठीं दुःखी माणस आहोंत बाबा रमेश. अस काहीं ऐकल कीं शरमेनं मरून जायला होत."

मुलेबाळे बरोबर घेऊन म्हातारा हळुहळू निघून गेला रमेश परत आला तेव्हा बोललेलें कठोर भाषण आठवून गागुलीबाबूला काहीतरी सागणार होता तोच त्याला थाबवून उसळून उठून तो म्हणाला, " हे आमचं घरचं काम आहे. रमेश, तू बोलाव कीं बोलावू नकोस, कार्य साजर करण्यासाठीं आम्हाला आलच पाहिजे. म्हणून तर आलों. मी आणि धर्मदासदादानं म्हणूनच तुझ्या आमत्रणाची वाट पाहिली नाहीं बाबा."

नुकताच तंबाखूचा दम मारून धर्मदास खोकू लागला होता तो काठीवर भार देऊन उभा राहिला. खोकल्याने प्राण कासावीस होत असताही सारखे हातवारे करीत म्हणाला, " ऐकलंस रमेश, तुला सागून ठेवतों, मी वेणी घोषाल नव्हे. अस्सलाचं बीज आहे हे ! "

त्याच्या कुत्सित भाषणामुळे रमेश चमकला खरा पण आपला राग त्याने बाहेर दाखवला नाहीं त्याला कळले होते कीं हे लोक जे काहीं बोलतात सकोच न धरतां जी भाषा वापरतात, ती नित्याच्या सरावामुळे. शिक्षणाच्या अभावीं शब्दाचें महत्त्व त्याच्या खिजगणतींत येत नाही.

काकूनें प्रेमानें जो धीर दिला, तसेच तिच्या दुखवलेल्या मनामुळे तिचा चेहरा उतरला. त्याची आठवण होताच रमेशला मनांतल्या मनात मोठी खंत वाटू लागली. सगळे निघून गेल्यावर तो दादाला भेटायला निघाला. वेणी-बाबूच्या आगणांत तो येऊन पोचला त्यावेळी रात्रीचे आठ वाजले होते. आंत कसली तरी लढाई सुरू होती. गोविंद गागुलीचा आवाज सर्वांच्या वर ऐकू येत होता. त्याच्या कानीं आले–गोविंद पैज लावून म्हणत होता, "दोन दिवसाच्या आंत जर धूळधाण उडाली नाहीं तर माझं गोविंद गागुली नाव बदलून टाका वेणीबाबू. कशी नबाबशाही सुरू झालीय कळलं ना? तारिणी घोषाल काय सव्वा रुपया ठेवून मरून गेला ते माहीत आहे आम्हाला तरी पण हें अवडबर कशाला? हातीं काहीं असल तर करा म्हणावं बापाचं श्राद्ध करण्यासाठीं असल नसलेलं गहाणं टाकून एव्हढा डागोरा कुणी कधीं पिटल्याचं मी तरी ऐकलं नाहीं बाबा. मी तुला प्रतिज्ञेवर सांगतों वेणीमाधवबाबू—बेट्यान नदीच्या पेढीवरून निदान तीन हजार रुपये तरी कर्जाऊ आणलेयत."

आवेश येऊन वेणी म्हणाला, "तर मग ही गोष्ट चव्हाट्यावर मांडलीच पाहिजे गोविंदकाका." आवाज खालीं आणीत गोविंद म्हणाला, "हा हा बाबा, सबूर कर जरा चांगलाच घसरू दे बेट्याला. तसं झालं म्हणजे—कोण बाहेर उभं आहे ते? कोण रमेशबाबूजी? आम्ही असताना तुम्ही एव्हढ्या रात्रीं यायचे कष्ट का घेतलेत बाबा?"

त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून पुढे येऊन रमेश म्हणाला, "दादा, मी तुमच्याकडे आलोंय."

वेणीबाबूला चट्कन् उत्तर सुचेना. गोविंद एकदम पुढें होऊन म्हणाला, "आला म्हणजे काय बाबा, शभर वेळ आलं पाहिजे. तुमचंच ना हे घर! वडील भाऊ म्हणजे बापासारखा म्हणून तर मी मुद्दाम आलों होतों. मला वेणीबाबूला सांगायचं हे, कीं तारिणीदादा गेला त्याच्याबरोबरच विरोध गेला. आता काय त्याचं? तुम्ही दोघे भाऊ एक व्हा. आमच्या डोळ्याचं पारणं एकदां फिटू द्या. कसं हालदारमामा? हे काय उभे का? राहिलात बाबानों? अरे कोण आहेरे, कांहीं तरी हांतरी–चटई आणा ना कुणी. नाहीं वेणीबाबू, तू वडील भाऊ–सारा काही तूच–तूं बाजूला राहून चालायचं नाहीं. शिवाय आतां खुद्द काकूच जाऊन तिथं हजर झाल्या तेव्हा—"

एकदम दचकून वेणीबाबू म्हणाला, " आई गेली होती ? "

त्याच्यावर झालेला परिणाम पाहून गोविंद मनातल्या मनांत फार खूष झाला, पण बाहेरून चांगुलपणाचा आव आणून अगदीं सहज सहज आपण झालेली हकीकत सांगतो आहे असे दाखविण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला, " नुसत्या गेल्याच काय ?—कोठीबिठी—सगळी इकडचीतिकडची व्यवस्था सार काहीं त्याच करताहेत. त्याच्याशिवाय दुसर कोण करणार हे काम ? "

सारेच स्तब्ध राहिले. एक मोठा सुस्कारा टाकून गोविंद म्हणाला, " छे ! या उभ्या गावात काकूच्या तोडीच दुसर कोण सापडेल ? छे छे ! कोण आहे ? नाहीं वेणीबाबू ? समोर बोललों तर खुशामत करतों म्हणाल--कुणी काही म्हणो, पण या गांवची कुणी लक्ष्मी असेल तर ती तुझी आई ! अशी आई मिळायला भाग्य हव " असे म्हणून पुनः एकदा मोठा सुस्कारा टाकून तो गंभीर होऊन राहिला.

क्षणभर विचार करून वेणीबाबू तोंडातल्या तोंडात पुटपुटला, " ठीक. "

गोविंदनें सूत्र पुढे सुरू केलें, " नुसतं ठीक नाही वेणीबाबू, गेल पाहिजे. सार काही केल पाहिजे. सारी जबाबदारी तुझ्यावर आहे. आपली सारी मंडळी आली आहे हे ठीकच झालं तरीही आमंत्रण कुणाला द्यायचीं त्याची एक यादी नको का करायला ! कस रमेशबाबूजी ? बरोबर म्हटल की नाहीं मी हालदारमामा ? तुम्ही का बोलत नाही धर्मदासदा ? कुणाला बोलवायच नाही ते माहीत आहे ना तुला ? "

रमेश मोठ्या आदबीने म्हणाला, " दादा, एकवेळ जर पायधूळ झाडाल–"

गंभीरपणे वेणीबाबू म्हणाला, " आई ज्याअर्थी गेली त्याअर्थी माझं जाण न जाण काय--काय गोविंदकाका ? "

गोविंदकाका बोलायच्या पूर्वीच रमेश म्हणाला, " तुम्हाला त्रास द्यायची माझी इच्छा नाहीं दादा, तशी काहीं हरकत नसेल तर एकवेळ जरा नजर टाकून जा ना. "

वेणीबाबू उगीच राहिला. गोविंद काही तरी बोलणार होता तोंच रमेश निघून गेला. बाहेरच्या बाजूला डोकावून पाहून गोविंद अगदी हळूच म्हणाला, " पाहा वेणीबाबू, गमत तर पहा. "

वेणीबाबू आपल्याशीच विचार करीत होता. तो एक शब्दही बोलला नाहीं.

रस्त्याने जात असतां गोविंदाचे भाषण आठवून रमेशाच्या मनांत त्याच्याबद्दल पूर्ण तिटकारा उत्पन्न झाला. अर्ध्या रस्त्यावरून तो पुनः मागें फिरला आणि वेणी घोषालच्या घरी आला. आगणात वादविवादाची मोठी झुबड उडाली होती पण ती ऐकण्याची त्याची प्रवृत्ति नव्हती. सरळ घरात जाऊन रमेशने हाक मारली, काकू "

काकू आपल्या खोलीच्या बाहेरील ओटीवर काळोखात उगीच बसली होती. एव्हढ्या रात्रीं रमेशचा आवाज ऐकून आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " कोण रमेश ? काय झाल रे ? "

रमेश आत आला. अस्वस्थ होऊन काकू म्हणाली, " जरा थाब बाबा. एक दिवा आणायला सागते."

" दिव्याची जरूरी नाहीं काकू. कशाला उठतां ? " असे म्हणून रमेश त्या काळोखातच एका बाजूला बसला तेव्हा काकूने विचारलें, " एवढ्या रात्रींसा आलास ? "

रमेश हळूच म्हणाला, " अजून कुणाला आमत्रणे दिलीं नाहीत काकू, तेव्हा मुद्दाम तुम्हाला विचारायला आलों."

" मोठ्या संकटात घालतो आहेस बाबा. हे काय म्हणतात ! गोविंद गांगुली, चतर्जी महाशय,--"

रमेश मध्येच म्हणाला, " ते काय म्हणतात ते मला माहीत नाही काकू— अन् कळून घ्यायची इच्छाही नाही. तुम्ही सांगा--मी तस ऐकेन."

एकदम रमेशची भाषा बदललेली पाहून विश्वेश्वरी मनातल्या मनात आश्चर्यचकित झाली. क्षणभर उगीच राहून ती म्हणाली,--" पण हेच सर्वांपेक्षा माझे आपले—असं म्हणाला होतास ना रमेश ? ते कांहीं असो, माझ बायको माणसाच कोण ऐकतो ? या गांवात-या गावातच्च का, साऱ्या गावांत-कुणी याला वाळीत टाकलय, कुणी त्याच्याबरोबर बोलत नाहीं--काहीं कार्यप्रस्थान असल तर माणस मिळण सुद्धा कठीण बसलय. कुणाला बाद द्यायच आणि कुणाला राखून धरायच हे ठरवण म्हणजे गावातलं मोठं भयकर काम होऊन बसलय."

रमेशच्या तिच्या बोलण्याचें आश्चर्य वाटले नाहीं. या कांहीं दिवसांत त्याला बऱ्याच नव्या नव्या गोष्टी कळूं लागल्या होत्या, तरीही त्यानें विचारले, " असं हें का होतं काकू ? "

" ते मोठे पुराण आहे बाबा, इथ राहिलास तर आपोआप सार काहीं तुला कळेल. कुणाकुणाकडून खरोखरच काहीं चुका झाल्या आहेत. कुणाकुणाच्या बाबतींत उगीच खोटे आरोप केले गेले आहेत–शिवाय ही कोर्ट, खटले, खोट्या साक्षी देणं–या पायीं वितंडवाद माजलेयत. दोन दिवस आधी जर मी तुझ्या तिकडे आले असते तर हा एव्हढा पसारा मुळींच मांडू दिला नसता. कार्याच्या दिवशीं काय होणार त्याचाच विचार मी करते आहे " असे म्हणून काकूने एक मोठा सुस्कारा सोडला.

त्या सुस्काऱ्याचे मर्म रमेशला उकलले नाही कुणाच्या हातून खरोखर चुका झाल्या आहेत आणि कुणावर खोटे आरोप केले गेले आहेत, याचाही अदाज त्याला करता आला नाही. तो उसळून उठून म्हणाला, " पण याचा माझा काहीच सबध आलेला नाहीं. एक प्रकारे मी या सर्वांना परकाच आहे. माझ कुणाशीं कसलच वैर नाहीं. म्हणून म्हणतो काकू, या कसल्याच भानगडींत न पडता साऱ्या ब्राह्मण–शूद्राना आमत्रण द्याव म्हणून मी म्हणतों. पण तुमच्या हुकमाखेरीज काहीं करता येत नाही एव्हढा हुकूम द्या काकू."

काहीं वेळ विचार करून काकू म्हणाली, " असा हुकूम देता येत नाहीं रमेश. त्यामुळं मोठ्या भानगडी उत्पन्न होतील. तुझा विचार चुकीचा आहे अस मी म्हणत नाहीं पण खऱ्या खोट्याचा निकाल द्यायची ही बाब नव्हे. बाबा, गावगगेन ज्याला शिक्षा देऊन वाळींत टाकलंय त्याला गावाविरुद्ध जाऊन बोलावता येत नाही गावगगा काहीं म्हणो पण तिचा हुकूम पाळला पाहिजे. त्याचं बरवाईट करण कुणाच्याही हातीं नाही—अस गावाविरुद्ध जाऊन चालायच नाहीं रमेश."
तसे पाहिले तर रमेशला ही गोष्ट पटत नव्हती असे नाही. पण आताच या गावगगेच्या पुढाऱ्याची जी नीच कारस्थानें त्याने प्रत्यक्ष पाहिलीं होती त्यामुळे त्याच्या हृदयात सतापाच्या आगीचा डोंब उठला होता. तो तिरस्काराने म्हणाला, " या गावची गावगंगा म्हणजे कोण ?—हा धर्मदास, हा गोविंद, हेच ना ? असल्या या गावच्या पुढाऱ्याना काहींसुद्धा करता येत नाही हेच मोट उत्तम आहे काकू. "

रमेश चिडून उठला होता हें काकूच्या लक्षात आले. तरीही ती शातपणें म्हणाली, " नुसते हेच नव्हे रमेश, तुझा वेणीदादा देखील या गावगगेचा पुढारी आहे—"

रमेश उगीच राहिला. काकू बोलत होती, " म्हणूनच मी म्हणते की या साऱ्याच्या सल्ल्यान वाग, रमेश. घरात पाऊल टाकल्यादिवशींच या लोकाशीं वैर बाधण बर नाहीं. "

रमेश फारच चिडला होता. किती दूरवरचा विचार करून विश्वेश्वरी हा उपदेश करीत होती ते पटवून घेण्याइतकी त्याच्या मनाची परिस्थिती नव्हती. तो म्हणाला, " तुम्हीं आतांच सागितलं ना काकू, कीं क्षुल्लक कारणामुळ इथ उगीच तंटे उद्भवतात म्हणून ? एकेका माणसाचा उपद्याप, मला वाटत, सर्वांपेक्षा जास्त त्रासदायक आहे. काय खर आहे काय खोटं आहे, कोण दोषी आहे, कोण निर्दोषी आहे, हे काहीं मी जाणत नाही. म्हणून कुणाला तरी बाद देऊन त्यांचा अपमान करण मला शोभणार नाही. "

काकू जरा हसून म्हणाली, " अरे वेड्या, मी तुझी वडील माणूस ना ? मी तुझ्या आईसारखी ना ? मी सागेन ते न ऐकण तुला शोभायचं नाहीं. "

" काय करू काकू ? साऱ्यानाच बोलवायचं म्हणून मी ठरवून बसलोय "

त्याचा निश्चय झालेला पाहून विश्वेश्वरी नाराज झाली. तिला वाईटसुद्धा वाटले. ती म्हणाली, " तर मग माझा हुकूम कशाला मागायला आलास ? हे ढोंग नाहीं का ? "

काकूला राग आल्याचे रमेशच्या ध्यानी आले खरे, पण तो आपल्या निश्चया-पासून ढळला नाही. क्षणभर थाबून तो शातपणे म्हणाला, " जी गोष्ट अयोग्य नाही ती करायला तुम्हीं मला आनदानं परवानगी द्याल—आशीर्वाद द्याल, अस मला वाटल होत. माझ—"

त्याचे भाषण सपण्याची वाट न पहाता विश्वेश्वरी मधेच म्हणाली " पण रमेश एव्हढं तर तुला कळल पाहिजे होत, कीं प्रत्यक्ष माझ्या मुलाच्या विरुद्ध मला जाता येत नाहीं ! "

हे बोलणे रमेशला लागले तोडाने ती काहींही म्हणो, पण कालपासून काकू एक प्रकारे आपल्या मुलाचा निर्वाळा देत होती. पण आतां त्याला दिसून आलें की या साऱ्या परिस्थितिपेक्षा आपल्या मुलाचा हक्क शाबीत करण्याची तिची प्रवृत्ति जास्त होती तो क्षणभर उगीच राहिला. मनात आलेला राग मनातच दाबून तो उठून उभा राहून म्हणाला, " कालपर्यंत मला असंच वाटत होतं काकू म्हणूनच मी बोललो, कीं मला एकट्याला झेपेल तेव्हढं मी करीन—तुम्ही कोणी येऊं नका. म्हणूनच तुम्हाला बोलवायचा मला धीर झाला नाहीं. "

आपल्या भाषणाचा रमेशला राग आला हें काकूच्या ध्यानीं आल्यावांचून राहिलें नाहीं. कांहींच उत्तर न देतां ती त्या काळोखात बसून राहिली. रमेश जायला निघाला आहे असे पाहून ती म्हणाली, " जरा थाब बेटा. तुझ्या कोठीच्या चाव्या आणून देतें. "

आपल्या खोलींत जाऊन ती तशीच बाहेर आली आणि चाव्या तिनें रमेशच्या पायाजवळ फेकल्या. विचार करीत रमेश थोडा वेळ थाबला आणि शेवटीं एक मोठा सुस्कारा टाकून चाव्यांचे जुडगे उचलून घेऊन हळूहळू निघून गेला.

थोड्याच वेळापूर्वी तो म्हणत होता, " आता माझी काकू आली, आता मी कुणाला भीत नाही. " पण एक रात्रसुद्धां गेली नाही. त्याची निराशा झाली. त्याला म्हणावे लागले, "नाहीं, माझ कुणीच नाहीं. काकूसुद्धा मला परकी झाली !"

## ४

इतक्यांतच बाहेर श्राद्ध सपून गेलें होते. आसनावरून उठून रमेश अभ्यागताचा परिचय करून घ्यायचा प्रयत्न करीत होता. घरात जेवणासाठी पानें माडलीं जात होतीं. इतक्यात--गडबड आरडाओरड ऐकून रमेश घाबरून आत आला. त्याच्याबरोबर आणखीही बरेच लोक आले. सैंपाकघरात दरवाज्याच्या एका बाजूला २५–२६ वर्षांची एक विधवा मुलगी पाठ फिरवून उभी होती आणि तिच्या समोर एक प्रौढ बाई रागानें डोळे वटारून मोठमोठ्याने ओरडून बोलत होती. तटा सुरू झाला होता प्राण हलदाग्बरोबर रमेश दिसताच प्रौढा ओरडून म्हणाली, " हा बाबा ! तूं तर या गावचा जमीनदार. तुम्हीच सागा, सारा दोष का ब्राह्मणाच्या मुलीचा ? आम्हाला कुणाचा पाठिंबा नाहीं म्हणून वाटेल तितक्या वेळा शिक्षा करणार का ? " गोविंदाकडे बोट करून ती म्हणाली " या यांनीं मुकर्जीच्या घरीं वटपौर्णिमेच्या वेळीं दंड म्हणून शाळेसाठी दहा रुपये आमच्याकडून वसूल नाहीं का केले ? शितळा देवीच्या पूजेसाठी दोन लुगडीं–जोडीचे पैसे नाहीं का घेतले ? मग ही एकच गोष्ट धरून किती घासाघीस करीत राहाणार तें तरी सागा ? "

भानगड काय आहे हें रमेशला कळेना. हकीकत सांगण्यासाठी गोविंद गागुली उठून उभा राहिला. एकवेळ रमेशकडे आणि एकवेळ त्या प्रौढ बाईकडे पाहून

तो गंभीरपणें म्हणाला, " आतां माझंच नाव घेतलंस क्षांतमावशी, तर खर काय ते सांगून टाकतों. हा गोविंद गांगुली तोंडदेखल बोलणारा नव्हे हे साऱ्या जगाला माहीत आहे. तुझ्या मुलीला प्रायश्चित्त दिलं, गावगंगेसाठी आम्ही दंड घेतला, हे कबूल—पण तिला यज्ञाची लाकड आणायला आम्ही तर हुकूम दिला नाहीं ? ही मेली तर हिला भाजायला न्यायला आम्ही खादा देऊ पण—"

क्षातमावशी एकदम किंचाळून म्हणाली, " तुझी मुलगी मेली म्हणजे तिला खांद्यावर नेऊन भाजून ये माझ्या बाबा ! माझ्या मुलीची तुला नको काळजी. मी अस म्हणते गोविद, आधीं आपल्या पायाखालीं काय जळतंय ते पहा. तुझी धाकटी भावजय, आतां कोठींत बसून विडे लावतेय, ती वर्ष सवावर्ष काशीला जाऊन पिवळी-धमक होऊन का आली माहीत आहे ? या मोठ्यांच्या मोठ्या गोष्टी वाटत ? उगीच वाटाघाटी नकोत. भ्रमाचा मोपळा मी आता फोडून टाकीन. आम्ही देखील गर्भार झालो होतो. आम्हाला देखील ओळखतां येत, आमच्या डोळयात का धूळ टाकणार तुम्ही ? "

गोविद एकदम उसळून उठून तिच्या अगावर जाऊन म्हणाला, " तर मग ए—हरामजादी !—"

हरामजादी मुळींच घाबरली नाहीं. उलट एक पाऊल पुढे सरून हातवारे करीत म्हणाली, " मारणार आहेस होय ? या ब्राह्मणीच्या अगाला हात लावलास तर सारा गांव उध्वस्त होऊन जाईल. माझी मुलगी काही सैपाकघरात जात नव्हती. नुसती कुठ उबरठ्याजवळ उभी राहिली तर या हलदारभावजींनीं तिचा अपमान केला ! मी म्हणते, त्याच्या वेणीची हकिकत माहीत आहे ना ? मी काय आजकालची नव्हे. आणखी बोलूं, की झाल तेवढं पुरे झाल ? "

रमेश काष्ठवत् होऊन उभा राहिला होता. भैरव आचार्य अस्वस्थ झाला. तिचा हात धरून काकुळतीनें म्हणाला, " पुरे झालं मावशी, आणखी नको. सुकुमारी, चल पोरी, चल ये माझ्याबरोबर त्या पलीकडच्या खोलीत बैस."

प्राण हलदार खाद्यावरचे उपरणे सरसावीत उठून बसला आणि म्हणाला, " या वेसवेला आताच्या आता घरातून हाकलून बाहेर काढलं नाहीं तर इथ तोडांत पाणी घेणार नाही हें सागून ठेवतों. गोविद ! कालीचरण ! तुम्हाला तुमचा मामा हवा असला तर चला निघा. ' मामा तिकडे जाऊं नका ' असं वेणी घोषाल म्हणाला ते अगदीं बरोबर होत. या साऱ्या साळकाया माळकाया

गोळा होऊन आमची जात घालवायला उठल्या आहेत ! काली, चल उठ. ’

मामा पुनः पुनः हाक मारीत होता तरी कालीचारण मान खाली घालून बसल होता. तो तागाचा व्यापार करी. चार वर्षांपूर्वी कलकत्त्याच्या त्याच्या एका सन्मान्य गिऱ्हाईक मित्राने त्याच्या धाकट्या विधवा बहिणीला घेऊन पलायन केलें होते. गोष्ट चव्हाट्यावर आली होती. एकदम सासुरवाडीला जाणे आणि तिथून तिर्थ-यात्रा करणे वगैरे प्रसगामुळे काही दिवस ती गोष्ट उघडकीस आली नाहीं. तीच हकिकत एवढ्या लोकासमक्ष पुन. चव्हाट्यावर येईल म्हणून कालीचरण मान खालीं घालून बसला होता. पण गोविंदाच्या अगाला लागलेली आग अजून थंडावली नव्हती. तो पुनः उठून उभा राहिला आणि टिपेचा आवाज लावून म्हणाला, “ कुणी काहीं म्हणो, या भागात गावाचा एक वेणी घोषाल, एक प्राण हलदार आणि यदू मुखर्जींची मुलगी. त्याना तर आम्हाला टाकता येत नाहीं. गावच्या विरुद्ध जाऊन या दोन वेसवा रमेशबाबूनीं घरी का घेतल्या याचा जाब मिळेपर्यंत आम्ही पाणीसुद्धा घेणार नाहीं.”

पहाता पहाता दहापाच जण उपरणीं खाद्यावर टाकून एकामागून एक उभे राहिले. खेडेगावचे लोक, गांवातल्या भानगडी, कुणाची बाजू घेणे जास्त फाय-द्याचे हें त्याना पुरे ठाऊक असते.

निमत्रित ब्राह्मण मडळी मनाला वाटेल ते बोलू लागली भैरव आणि दिनू भटजी रडकुडीला आले होते. एकदा क्षातमावशी आणि तिची मुलगी, एकदा गागुली आणि हलदार महाशयाच्या पुढे ते पदर पसरू लागले. चोहीकडून एकच गोंधळ उडाला आणि सारे कार्य उसकटून पडल्यासारखे वाटूं लागले.

तरीही रमेशच्या तोंडून एकसुद्धा शब्द निघाला नाहीं. आधींच तो भुके-तहानेनें पेंगुळला होता. त्यातून अकस्मात् ही भानगड उपस्थित झाली. अगदी हतबुद्ध होऊन तो वेड्यासारखा नुसता पहात राहिला होता.

“ रमेश ! ” सर्वांची नजर एकदम विश्वेश्वरीकडे वळली. कोठींतून बाहेर येऊन ती दारासमोर उभी राहिली होती तिने माथ्यावरून पदर घेतला होता। पण तोंड झाकले नव्हते. काकू आपणहूनच केव्हां तरी आली--तिने अतर दिले नाहीं असे रमेशला दिसून आले.

हीच विश्वेश्वरी--हीच घोषाल घरची गृहिणी हें सर्वांना दिसून आले.

खेडेगांवात पडदा कडकपणे पाळला जात नाही. मोठ्या घरची म्हणून असो,

कीं दुसऱ्या कोणत्याही कारणानें असो, एवढे वय झाले होते तरी विश्वेश्वरी सहसा कुणासमोर बाहेर पडत नसे. म्हणूनच सर्वांना आश्चर्य वाटले. पुष्कळांना ऐकून माहीत होते, पण प्रत्यक्ष कुणीही तिच्या त्या तीक्ष्ण दृष्टीला नजर दिली नव्हती. तिच्याकडे पहाताच सारेच एकदम थबकले. बहुधा ती रागाच्या भरात एकदम बाहेर आली असावी. सर्वांची दृष्टि आपल्याकडे लागली आहे असे पहाताच, ती ऐकदम खांबाआड बाजूला सरली. तिच्या खणखणीत हाकेमुळे रमेश भानावर आला. तो समोर आला असे पाहून तितक्याच खणखणीत आवाजात काकू म्हणाली, " रमेश, गागुलीबाबूंना म्हणाव, तंबी द्यायच काम नाहीं. अन् हलदारबाबूंना देखील माझ्या नावान साग, सर्वांना मानानं बोलवून आणल आहे, सुकुमारीचा असा अपमान करायच काही कारण नव्हतं. घरी धर्मकार्य चालल आहे. अशा वेळी आरडाओरडा, गाळागाळी केलेली मला खपायची नाही. ज्याना पटत नसेल त्यानी दुसऱ्या कुठ जाऊन बसाव. "

काकूचा कडक हुकूम सर्वांनीं आपल्या कानानीं ऐकला रमेशाच्या तोंडून शब्द निघेना—त्याची जीभच लुली पडली होती. दिलेल्या हुकूमाचा परिणाम काय झाला हे थांबून पहायच्या भानगडींत तो पडला नाहीं. काकूनीं सारी जबाबदारी आपल्यावर घेतली आहे असे पाहून डोळ्यातले पाणी कसे तरी पुसून तो एकदम तिथून निघून गेला. त्याच्या डोळयातून एकदम आसवाच्या धारा व्हायला लागल्या.

आज सारा दिवस तो आपल्याच कामात गर्क होता. कोण आला आणि कोण आला नाही याची चौकशी त्याला करतां आली नव्हती. कुणीही येवो पण काकू येईल असे त्याला मुळीसुद्धां वाटले नव्हते.

जे उठून उभे राहिले होते ते हळूहळू मुकाट्याने बसले. गोविद गागुली आणि प्राण हलदार मात्र तसेच ताठ होऊन राहिले होते. गर्दीतला कुणीतरी माणूस त्याना उद्देशून हळूच म्हणाला, " आता खाली बसा ना काका, पोटभर खाऊन झाल्यावर सोळा पुऱ्या आणि चार जोड्या लाडू कुणी कधीं घरीं न्यायला दिल्या होत्या आजपर्यंत ? "

पहाता पहाता प्राण हलदार बाहेर निघून गेला—पण आश्चर्य हें, की गोविद गागुली खरोखरच बसून राहिला. त्यानें चेहेऱ्यावर रुसव्याचा आव ओढून आणला होता. काहीं तरी काम आहे असे निमित्त करून पानें वाढल्यावर सर्वांबरोबर

पक्तीला जेवायला बसला नाहीं. ज्याच्या हे लक्षात आलें ते म्हणाले, कीं गोविंद काही सहसा हरणारा नव्हे.

त्यानंतर कांहीं गडबड झाली नाही. ब्राह्मणानी जेवणावर कसा ताव मारला हे ज्यानीं प्रत्यक्ष पाहिले नाहीं त्याना कळणार नाही शिवाय प्रत्येकानें मुलगे, मुली, पुतणे, भाचे, भाच्या वगैरे असल्या नसल्या मुलामुलींची नावे घेऊन जे बाधून घेतले तेही काही थोडेथोडके नव्हते.

सध्याकाळीं सारी निरवानिरव झाल्यावर रमेश सदर दरवाजाच्या बाहेर पेरुच्या झाडाखालीं अस्वस्थपणे उभा राहिला होता. त्याचे चित्त व्यग्र झाले होते. दिनू-भटजी मुलामुलींना घेऊन मिळतील त्या पक्वान्नाचे भलेमोठे गाठोडे बाधून दृष्टि चुकवून पळून जात असलेला त्याने पाहिला. पहिल्याने ते मुलीच्या नजरेला आलें. ती घाबरली आणि कोरड्या वाणीनें म्हणाली, " बाबा, बापूजी उभे आहेत "

सर्वांचीच घाबरगुंडी उडाली. त्या पोरीच्या उद्गारामुळे रमेशला सारी हकिकत कळून आली. निघून जायला मार्ग असता तर स्वतःच त्यानें तिथून पाय काढला असता. पण आता उपाय नाही असे पाहून तो पुढे येऊन हसत म्हणाला, "खेदी हे कुणासाठीं नेते आहेस ग ? "

पोरीला बरोबर उत्तर देतां येणार नाहीं असे वाटून दिनूभटजी पुढे सरसावला आणि हसण्याचा खोटा आव आणून म्हणाला, " गावची शूद्रांचीं पोरबाळं आहेत ना बाबा ! आम्हीं काहीं तरी घेऊन जाणार न् ती पोर पुढे आलीं तर त्याना नको का काहीं द्यायला ? ते काहीं असो बाबा, सारा गांव आमच्या तिला आई का म्हणतो ते आज मला कळल."

त्याच्या बोलण्याला काहींच उत्तर न देतां रमेश फाटकापर्यंत त्याच्याबरोबर चालत गेला. एकदम त्यानें दिनूभटजीला विचारले, " ठीक, भटजी महाराज, आपल्याला इकडची सारी माहिती आहे. या गावांत आपसांत एव्हढी तेढ आहे ती का म्हणून ? "

चुचकारण्याचा आवाज करीत एक दोन वेळ मान हलवीत दिनूभटजी म्हणाला, " अरे बाबा, काय सागूं ? कसल हें आपलं कुवापूर ? खेंदीच्या मामांच्या घरीं गेलों होतों. तिथली गंमत पाहिली. ब्राह्मण कायस्थांची सारीं वीस घर—पण गावात चार तट आहेत. हरनाथ विश्वासानं दोन विलायती आवळे पाडले, म्हणून त्याला स्वतःच्या भाच्याला तुरुगांत घालायला लावलं तेव्हां

लोकानीं सोडल. सारे गाव हे असेच, पण त्यातल्या त्यात कमी, कुठं जास्त. खेदी, हरधनला जरा विसावा दे ना. ”

रमेशने पुनः विचारले, “ याला काहीं उपायच नाहीं का भटजी महाराज ? ”

“ उपाय काय करणार बाबा ? घोर कली मातला आहे ना ? ” एक सुस्कारा सोडून भटजी म्हणाला, “ तरी एक गोष्ट सांगतों बाबूजी, भिक्षेसाठी मी हजार जागीं जातो—पुष्कळजण अनुग्रह करतात. मी पाह्यलय तं अस आहे. तरुण माणसाच्या ठिकाणी दयाधर्म आहे–नाहीं काय तो या बुड्ढ्या लोकात. जरा कुठं सवड सापडली, की दुसऱ्याच्या गळ्यावर पाय देऊन त्याची जीभ ओढून काढल्या शिवाय राह्यचे नाहींत—” असे म्हणून दिनूभटजीने ज्या वेळीं जीभ ओढून काढायचा अभिनय करून दाखवला त्यावेळीं रमेशला हसू कोसळलें.

पण दिनूभटजी हसला नाही. म्हणाला, “ हसायची गोष्ट नव्हे बाबूजी, मी देखील म्हातारा झालो आहे,—खर आहे—पण तुम्ही लोक या काळोखाच्या पार पलीकडे गेला आहात बाबूजी. ”

“ ते राहू दे आधी माझ्या प्रश्नाच उत्तर द्या भटजी.

“ दुसर काय उत्तर देऊ. खेडीं तेवढी सारीं सारखींच. हाच गोविंद गांगुली—बेट्याच्या पापाचा उच्चार केला तर प्रायश्चित करावं लागेल—ती भटीण काहीं खोट बोलली नाही.—पण सारे त्याला भितात. बनावट दस्तऐवज करण्यात, खोटी साक्ष देण्यात, खोटे खटले करण्यात त्याचा हात धरणारा कुणी नाही. शिवाय वेणीबाबूवर त्याची छाप. त्यामुळं त्याच्या विरुद्ध बोलायची कुणाची छाती नाहीं उलट हाच गावच्या पाच जणाना वाळींत टाकतो ! ”

कांहीच न बोलता रमेश त्याच्याबरोबर पुष्कळ वेळ चालत जात होता. सतापाने त्याच्या अंगाची काहिली झाली होती. आपणहून दिनू बोलूं लागला. “ माझं हें सांगण तुम्ही ध्यानी घ्या बाबूजी, क्षातमावशी सहज हटणारी बाई नाही. गोविंद गांगुली, प्राण हल्दार या दोघाना दडपून वठणीला आणणं काहीं साध काम नव्हे. पण कांही म्हणा, बाई मोठी धीट खरी. आणि धीट कशी असणार नाहीं ? चुरमुरे करून विकते. सर्वांच्या घरीं येण जाणं—सर्वांच्या भानगडी तिला कळतात. तिच्या गोष्टीला गेल तर अंगावर शितोडा उडल्यावांचून राहाणार नाहीं हें सांगून ठेवतों. तसं पाहिल, तर कुणाच्या घरीं अनाचार नाहीं. आता हा वेणीबाबू—”

रमेश घाबरून मधेच म्हणाला, "राहूं दे. दादाचं नांव घ्यायचं कारण नाहीं."

ओशाळून दिनूभटजी म्हणाला, "राहूं दे बाबा, आम्ही दुःखी माणसं. कुणाच्या गोष्टी आम्हाला कशाला ? वेणीबाबूच्या कानीं गेल तर तो माझ्या घराला आग घालील.—"

पुनः रमेश मध्येच म्हणाला, "आपलं घर आणखी किती दूर आहे भटजी ?"

"नाहीं बाबा, फार दूर नाही. या बाधाजवळच आहे माझी झोपडी. कधी केव्हा जर—"

"यायच ना ? अगत्य येईन !" असे म्हणून परतत असताना रमेश म्हणाला, 'उद्या सकाळी भेट व्हायची आहे. पण त्यानतर सुद्धा मधून मधून पायधूळ झाडीत जा."

असे म्हणून रमेश जाऊ लागला.

"दीर्घजीवी हो ! बापासारखा हो !" असा अतःकरणपूर्वक आशीर्वाद देऊन दिनूभटजी आपली कचींबची घेऊन निघून गेला.

५

गावात किराण्या मालाचे एकच दुकान होते. नदीच्या रस्त्यावर बाजार भरत असे त्याच्या एका बाजूला मधू पालचे हें दुकान होते. दहाबारा दिवस होऊन गेले पण बाकी राहिलेले दहा रुपये घेऊन जायला मधू आला नाही म्हणून रमेश एके दिवशी सकाळीं मधूच्या दुकानाकडे वळला. धनी आलेले पाहून मधू पालनें मोठ्या अदबीनें त्याचें स्वागत केले. बाबूजींचें येण्याचें कारण कळताच तो आश्चर्यानें थक्क झाला. देणेकरी स्वतः दारी येऊन आपलें देणे फेडून टाकतो असे एव्हढ्या वयात मधू पालनें कधीं पाह्यले नव्हते कीं ऐकलें नव्हते.

बोलता बोलतां पुष्कळ गोष्टी निघाल्या. मधू म्हणाला, 'दुकान कस चालेल बाबूजी ? आणा दोन आण्यापासून रुपया सव्वारुपयापर्यंत प्रत्येकाच देणं धरल तरी ५०–६० रुपये बाकी राहिली आहे. आतां देतो म्हणून दोन दोन महिने गेले तरी मिळायची बात नाहीं ! हे कोण ? बानर्जी महाशय, केव्हा आलात ? नमस्कार !"

हातात एक ताब्या, पाय चिखलानें माखलेले, कानावर जानवे ठेवलेले आणि डाव्या हातांत हिरव्या पानांतून गुंडाळलेल्या चार कोंलब्या घेऊन बानर्जी महाशय हजर झाले. येताच त्यांनी एक मोठा सुस्कारा सोडला. ते म्हणाले, "काल रात्री

आलों ! जरा तंबाखू काढ पाहू मधू !—" असे म्हणून ताब्या बाजूला ठेऊन चारी कोंलब्या जुळवून धरून म्हणाले," सैरू कोळणीची अक्कल पाहिलीस मधू ? एकदम माझा हात धरला. कसे काळे झालेयत पहा हात ही का एका पैशाची कोंलबी ? ब्राह्मणाला अस फसवून कुठल्या नरकाच साधन करते आहे शिची ! "

मधू आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " हात धरला तुमचा ? "

सतापलेले बानर्जीबाबू चोहीकडे रागारागाने नजर फेकीत म्हणाले," अडीच पैसे द्यायचे राहिलेयत, त्यासाठीं साऱ्या लोकाच्या देखत शिचीन हात धरला बघ ! माळावरून आलों-म्हटलं, ताब्या घासून हातपाय धुवून बाजाराला जाव. टोपली-भर मासे घेऊन बसली होती आणि मला काय म्हणते,—' काहीं सुद्धा शिल्लक नाहीं, होतं तेवढ विकल ! '–अरे, माझ्या डोळ्यात धूळ टाकते ! म्हणून टोपली उघडून बघायला लागलो तेव्हा एकदम माझा हात धरला कीं शिचीन ! ते पूर्वीचे अडीच, हा आजचा एक, या साडेतीन पैशासाठी काही मी गाव सोडून पळ-णार नाहीं. तुला काय वाटत मधू ? "

मधूसुद्धा म्हणाला, " असं कधी झालंय ? "

" तेच तर म्हणतो काही गावचा कायदा म्हणून आहे कीं नाहीं इथ ? नाहींतर या पष्टी कोळ्याच गुडगुडी पाणी, परीट, न्हावी बंद करून त्याच मुडन करून कां कुणी टाकीत नाहीं ? " एकदम रमेशकडे पाहून तो म्हणाला, " हे कोण गृहस्थ मधू ? "

मधू मोठ्या अभिमानाने उद्‌गारला, " आपले छोटेबाबू ना हे ? त्या दिव-शींचे दहा रूपये राहिले होते ते द्यायला स्वतः वाड्यावरून इथपर्यंत आले बर !"

बानर्जीबाबू कच्या कोलबीची भानगड विसरून भुवई चढवून म्हणाले, " कोण रमेशबाबूजी ? चिरजीव हो बाबा ! हा आलो तेव्हा ऐकल, की थाटान थाट उडवून दिला ! खाण्याजेवणाची चंगळ या भागात अशी कधी झाली नव्हती. पण दुःख वाटल ते एवढ्यासाठींच की स्वतःच्या डोळ्यान ते काही पाहिल नाही. चार माणसाच्या शब्दाला फसून नोकरीसाठीं कलकत्त्याला गेलो, तिथं नुसते हाल झाले एवढंच. छे छे ती काय माणसं राह्यची जागा ? "

या माणसाच्या चेहऱ्याकडे पहात रमेश उगीच उभा राहिला होता पण दुकानांत गोळा झालेले लोक त्याच्या कलकत्त्याच्या प्रवासाचा इतिहास ऐकण्या-साठीं आतूर झालेले दिसले.

तबाखू भरून हुक्का बानर्जीच्या हाती देऊन मधू दुकानदारानें प्रश्न केला, " बर मग ? तिथ काहीं चाकरीबिकरी लागली ? "

" नाही लागायची ? अस काय चणे चुरमुरे देऊन शिकलोंय ! पण मिळून काय उपयोग ? कोण तिथं राहील सागा ? जसा धूर तसाच चिखल. घराच्या बाहेर पडलं, तर घोड्याखालीं न नांपडता घरी परत आले तर ते बापजाद्याच्या पुण्याईनं ! "

मधू कधीं कलकत्त्याला गेला नव्हता. साक्ष देण्यासाठीं एकदां मेदिनीपूरला गेला होता. तेव्हढाच काय तो त्याचा शहरचा प्रवास. तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " म्हणता तरी काय ? "

बानर्जी थोडासा हसला आणि म्हणाला, " खर की खोट ते तुझ्या रमेशबाबूलाच विचारा ना ? नाही बर मधू, खायला मिळाल नाहीं तर छातीवर हात धरून घरी पडून मेलेल पुरवल, पण विदेशी जायच नाव आता कुणी माझ्याकडे काढ़ नये. तुम्हाला खर वाटायच नाही, पण तिथं पडवळ, दोडकीं, भेंड्या, मिरची, कोथिबीरसुद्धा विकत घ्यावी लागते ! हे पत्करेल ? असे उपास काढले एक महिनाभर—अन् हा असा रोगट उदीर बनून आलो. रात्रदिवस पोटात अस अस व्हायच, छातींत डागत राह्यचं, जीव कसा खालीं वर होई. एकदा आलो तिथून पळून तेव्हा सुटलो अस वाटल. नाहीं बाबा, आपल्या गावीं बसून जे काहीं मिळेल ते एकवेळ खाव—नाहीं मिळालं तर पोरबाळ हातीं धरून भीक मागावी—ब्राह्मणाला त्यात काहीं लाज वाटायला नको, पण—आई लक्ष्मी तिकडे स्वर्गात राहो—पण आपलं घर सोडून कुणी परदेशी जाऊं नये. "

त्याची कहाणी ऐकून सर्वांची जशी काहीं बोबडी वळली होती. तितक्यांत बानर्जी मधूच्या तेलाच्या भांड्याकडे गेला आणि डवल बुडवून एक छटाक तेल डाव्या हातात घेऊन, अर्धें एका कानांत, अर्धें दुसऱ्या कानात घालून बाकीचे डोक्याला चोळीत म्हणाला, " फार उशीर झाला. एकदा नदींत बुडी मारून घरी जातों. एक पैशाचं मीठ दे पाहू मधू. दुपारी पैसे देऊन टाकीन."

पुनः दुपारीं ! बिचारा मधू वाकडें तोंड करून मीठ देण्यासाठीं दुकानांत शिरला. बानर्जी आंत डोकावून पाहून आश्चर्यचकित झाल्याचा आव आणून म्हणाला," तुला झालाय काय मधू ? थोबाडींत लगावून पैसा घ्यायचाय वाटतं ?" असे म्हणत पुढे सरकून स्वतःच एक पैसा मीठ द्रोणांत भरून घेऊन निघाला.

हाती तांब्या घेऊन रमेशकडे पहात हंसत हंसत म्हणाला, "तीच वाट आहे जायची. चला ना बाबूजी, बोलत बोलत जाऊ."

"चला." म्हणून रमेश उठून उभा राहिला. पलीकडून दुकानातून मधू काकूळतीनें म्हणाला, "बानर्जी महाशय, ते कणकीचे पांच आणे राहिले आहेत ते—"

खवळून उठून बानर्जी म्हणाला, "तुला म्हणावं काय मधू? सकाळ संध्याकाळ डोळयाला डोळा देणं आहे–तुझ्या डोळयाला काय चामडी सुद्धा नाही का? पाच मुलामुलींसाठीं कलकत्त्याला जाऊन येण्यात माझे पाचपाच रुपये पाण्यात गेले अन् या वेळी तुला तगादा करायला फावतंय होय? न कर्त्याचा वार शनवार! पाहिलत रमेशबाबूजी, याचा हा व्यवहार पाहिलात?"

मधू अगदीं एव्हढासा होऊन तोंडातल्या तोंडात पुटपुटला, "इतक्या दिवसाच देणं—"

"असेल इतक्या दिवसांच! असे तुम्ही सारेच जर हात धुवून पाठीला लागलात तर गावात राहणं मुष्कील होईल." असे म्हणून बानर्जीबाबू रागा-रागाने सारे जिन्नस घेऊन चालता झाला.

रमेश घरीं आला घरात पाऊल टाकतो आहे तोच एक गृहस्थ घाबरून हातातली गुडगुडी बाजूला ठेवून एकदम त्याचे पाय धरून नमस्कार करू लागला. तो उठून म्हणाला, "मी वनमाली पाडे. आपल्या शाळेचा हेडमास्तर. दोन दिवस येतो आहे पण भेट झाली नाही तेव्हा—"

रमेशने सत्कारपूर्वक त्याला खुर्चीवर बसायला सांगितले पण तो अदबीनें तसाच उभा राहिला आणि म्हणाला, "मी आपला सेवक आहे."

वयोवृद्ध माणूस—त्यातून कसाही असो—एक शाळेचा शिक्षक. त्याची ही फाजील विनयाची वृत्ति पाहून रमेशला त्याबद्दल अश्रद्धा उत्पन्न झाली.

काही केले तरी तो खुर्चीवर बसेना. उभ्या उभ्यानेच आपली हकिकत सांगू लागला. या बाजूची ही एक लहानशी शाळा होती. मुखर्जी आणि घोषाल या दोघांच्या कृपेनें अस्तित्वात आली होती. शाळेत तीस चाळीस विद्यार्थी शिकत होते. काहींजण दोन दोन तीन तीन कोसांवरून येत होते. थोडीशी सरकारी ग्रँटही मिळत होती तरीही शाळा चालणे कठीण जात होते. लहानपणीं याच शाळेत आपण शिकत असल्याची रमेशला आठवण झाली. वनमालीबाबूनीं

सागितले, कीं या वर्षी कौलें घेतलीं नाहींत तर पुढल्या वर्षी शाळेत कुणी येणार सुद्धा नाहीं. ते आज न झाले तरी चालेल पण आजचे संकट हें होते, कीं शिक्षकाना तीन महिने पगार मिळाला नव्हता. घरचे खाऊन शेटची नोकरी करायला यापुढे कुणी तयार नव्हते.

शाळेचे नांव निघताच रमेश एकदम उत्साहित झाला. हेडमास्तरना बैठकखान्यात घेऊन जाऊन त्यानें त्याच्याकडून सारी हकीकत ऐकून घेतली. शाळेत चार शिक्षक होते आणि त्यांच्या उरस्फोडीचे फळ म्हणून दरवर्षी दोन तरी विद्यार्थी मायनर परीक्षा पास होत होते त्याचीं नावे गवे मास्तरानीं सागितली. विद्यार्थ्यांकडून जी फी मिळे त्यांतून खालच्या वर्गांच्या दोन शिक्षकाच्या पगाराचे भागे आणि सरकारी ग्रँटमधून आणखी एका शिक्षकाची सोय होई. राहिलेल्या एका शिक्षकाचा पगार गावात वर्गणी करून मिळवावा लागे.

ही वर्गणी जमा करण्याचे काम मास्तरनाच करावें लागे. गेले तीन चार महिने घरोघर आठ दहा खेपा घालून तगडीमोड केली तरी सात रुपये चार आण्यापेक्षां जास्त वर्गणी जमा झाली नाही.

हकिकत ऐकून रमेश स्तंभित झाला पाच सहा गांवें मिळून ही एकच शाळा होती–या पाच सहा गावांत तीन महिने खेटे घालून सात रुपये चार आणे मिळाले ! रमेशनें, " आपल्याला काय पगार आहे ? "

मास्तर म्हणाले, " पावती द्यावी लागते सव्वीस रुपयाची—पण मिळतात तेरा रुपये पधरा आणे. "

मास्तरचे म्हणणे रमेशला चागलेंसे कळले नाही तो नुसता त्यांच्या तोंडाकडे पहात राहिला. तें ध्यानी येऊन मास्तर म्हणाले, " सरकारी हुकूम आहे ना ? म्हणून सव्वीस रुपयांची पावती सब-इन्स्पेक्टरबाबूना दाखवावी लागते. नाहीं तर सरकारी ग्रँट बंद होईल. सर्वांना हें माहीत आहे. मी कांहीं खोट सांगत नाहीं. कुणाही विद्यार्थ्याला विचारून खात्री करून घ्या. "

रमेश किती तरी वेळ उगीच बसून राहिला आणि नतर म्हणाला, "अशामुळं विद्यार्थ्यांच्या मनात आपल्याबद्दल अनादर नाहीं का उत्पन्न व्हायचा ? "

मास्तर लाजेनें चूरमार होऊन गेले. म्हणाले, " काय करायचं रमेशबाबू, वेणीबाबूसारखा माणूस चार पैसे द्यायला नाराज—"

" व्यवस्थापक ते आहेत वाटतं ? "

काय उत्तर द्यावे हें मास्तरना सुचेना. त्यांचे मन द्विधा होत होतें पण बोलल्याखेरीज गत्यंतर नव्हतें म्हणून त्यांनी हळूहळू सागायला सुरवात केली. " ते सेक्रेटरी आहेत खरे पण कधीं एक पैसा सुद्धा देत नाहीत. यदू मुखर्जींची मुलगी—सति लक्ष्मी आहे बिचारी—तिची कृपा नसती तर यापूर्वीच शाळा बद झाली असती. दरवर्षाप्रमाणे या वर्षीसुद्धा खर्च चालवीन अशी आशा देऊन तिन सारी मदत एकदम का बंद केली याच कारण काहीं कुणाला सागतां येणार नाहीं."

चौकस दृष्टीनें रमेशनें रमेबद्दल कांहीं प्रश्न विचारले आणि शेवटी म्हटले, " तिचा एक भाऊ याच शाळेत शिकतो ना ? "

मास्तर म्हणाले, " यतीन ना ? हो तर. याच शाळेत आहे तो."

रमेश म्हणाला, " आपली शाळेला जायची वेळ झाली. आज आपण आतां जा. उद्यां मीच स्वतः आपल्या तिकडे येईन."

रमेश नको नको म्हणत असता बळेच त्याच्या पायाला हात लावून नमस्कार करून हेडमास्तर निघून गेले

## ६

त्या दिवशींची विश्वेश्वरीची हकिकत त्याच दिवशी दहा गावांत फैलावली गेली. वेणीबाबूला स्वतः दुसऱ्या कुणाच्या समोर वांकडे बोलता येणे शक्य नव्हते म्हणून त्याने जाऊन रमेशाच्या मावशीला बोलावून आणले.

पूर्वी पुराणकाळीं एका पिपळाच्या झाडाला तक्षकाने दश करताच ते झाड उभे जळून खाक झाले होतें. या मावशीनें त्या दिवशी सकाळींच घरीं येऊन जो विषारी दंश केला, त्यामुळे विश्वेश्वरीचा हाडामासाचा देह लाकडाचा नव्हता म्हणून असो, की त्या काळात नि या काळांत फरक फडला होता म्हणून असो, जळून खाक झाला नाहीं.

विश्वेश्वरीनें सारा अपमान सहन केला. हे सारे आपल्या मुलाचेच कारस्थान असावें अशी तिची अटकळ होती. रागानें तोंडांतून एकादा शब्द गेला तर ही बाई सर्वासमक्ष आपल्या मुलाचें बिंग बाहेर काढील आणि तें रमेशाच्या कानीं जाईल या भयानें ती तोंडाला कुलूप लावून बसली होती.

पण खेडेगांवांत कांहींच गोष्ट गुप्त राहू शकत नाहीं. जें कळायचे ते रमेशाला

कळले. पहिल्यापासूनच त्याला वाटत होते, की आपल्यामुळे काकू आणि तिचा मुलगा यांच्यामधें कलहाचे बीज रुजणार. पण बाहेरच्या माणसाना घरी आणून आपल्या आईचा अशा रीतीने वेणीबाबू अपमान करील असे त्याला वाटले नव्हते. ही अगदी मुलखावेगळीच गोष्ट घडून आली असे वाटून त्याच क्षणी त्याचा राग भयंकर भडकून उठला.

एकदा त्याला असे वाटले, की सरळ त्या घरी जावे आणि तोंडाला येईल ते बोलून वेणीबाबूला सडकून शिव्या द्याव्या. जो माणूस प्रत्यक्ष आपल्या आईचा अशा रीतीने अपमान करतो त्याची कदर कसली बाळगायची ? पण दुसऱ्याच क्षणाला त्याला वाटले, कीं अशामुळे काकूच्या अपमानाचे प्रमाण कमी होण्या-ऐवजी उलट वाढेल मात्र.

त्या दिवशी दिनूभटजीच्या तोंडून आणि काल हेडमास्तरकडून जी हकिकत कळली त्यामुळे रमेच्या बाबतीत त्याच्या ठिकाणी एक प्रकारची श्रद्धा उत्पन्न झाली होती. चारी बाजूने मूर्खपणा आणि हजारो प्रकारचा कुत्सित क्षुद्रपणा उसळला असता एक काकूखेरीज सारा गाव अंधारात बुडून गेला आहे असा ज्यावेळीं त्याचा पूर्ण समज झाला होता, त्यावेळी मुखर्जीच्या घराकडे पहाताना त्याला थोडासा प्रकाशाचा आभास—तो कितीका लहान असेना—झाल्यामुळे त्याला बरेच समाधान वाटले.

पण आजचा हा प्रकार कळताच त्याचे मन तिटकाऱ्याने भरून गेलें. वेणीबाबूला जोड देऊन मावशी आणि भाची या दोघींनीं हे कारस्थान केले. याबद्दल त्याला मुळींच संशय राहिला नाहीं. पण या दोन बायाना शिक्षा कोणती लावायची आणि वेणीबाबूलाही कोणती अद्दल कशा प्रकारे लावायची हे त्याला ठरवता येईना.

इतक्यात एक भानगड निघाली. मुखर्जी आणि घोषाल या दोन्ही घराण्यातली दोन भाग न झालेली काहीं विषयसंपत्ती होती. आचार्यांच्या घराच्यामागे अस-लेली एक पुष्करणी या दोघाच्या जोड मालकीची होती. एका काली ती पुष्करणी फार मोठी होती. पण पुष्कळ दिवस डागडुजी न केल्यामुळे तिला सामान्य डबक्याचे स्वरूप आलें होते. चागले मासे या पुष्करणींत टाकता येत नसत आणि नव्हतेही. असल्या डबक्यांतून आपोआप निर्माण होणारे कांहीं साधे मासेच होते.

भैरव धापा टाकीत आला. चंडीमंडपाच्या शेजारच्या खोलींत कारकून गोपाळ

सरकार वही लिहीत बसला होता. भैरव घाईघाईने म्हणाला, " सरकार महाशय, माणसं पाठवा ना. पुष्करणीतले मासे काढून नेत आहेत."

लेखणी कानावर खोवून वर पहात सरकार म्हणाला, " कोण नेत आहेत ? "

" दुसर कोण—? वेणीबाबूचे नोकर उभे आहेत. सुखर्जीचा दरवान हजर आहे. पाहिलं, तो आपलाच कुणी माणूस तिथ नाहीं. लवकर कुणी तरी पाठवा."

गोपाळ सरकारवर त्याचा मुळीच परिणाम झाला नाहीं तो म्हणाला, " आमचे बाबू मासमच्छर खात नाहीत."

भैरव म्हणाला, " न का खाईनात. पण सत्तेचा भाग तर घेतला पाहिजे आपला ! "

गोपाळ म्हणाला, " आम्हा लोकाना तर पाहिजेत ? थोरले बाबूजी जिवत असते तर त्यानींही आग्रह धरला असता. पण रमेशबाबूचा प्रकार थोडा निराळा आहे—" भैरवाच्या चेहेऱ्यावर आश्चर्याचे चिन्ह दिसल्यामुळे हसून थोडीशी कोटी करण्याच्या उद्देशानें तो म्हणाला, " हे तर कसले यःकश्चित् चारदोन मासे. आचार्य महाशय, त्या दिवशी बाजारच्या उत्तरेला असलेल भल मोठ चिंचेचं झाड तोडून दोन भाग करून त्यानी नेल. एक काटकी सुद्धा आम्हाला दिली नाहीं. मी बाबूना सागायला आलों. ते वाचीत बसले होते. नुसते वर तोड करून पाहिल आणि हंसून पुनः वाचू लागले. मी विचारलं, 'काय करायच बाबू ?' पण वर तोंड करून पाह्यचीसुद्धा त्यानीं तसदी घेतली नाहीं. मी अगदींच जिकीर करू लागलो तेव्हा पुस्तक बद करून एक जाभई देत म्हणाले, ' लाकडं होय ? दुसर झाड नाहीं का आपल्याकडे ? ' हें काय बोलण झाल ? मी म्हटलं, ' आहेत ना दुसरी झाड पण आपला सत्तेचा भाग का सोडा ? दुसऱ्या कुणी कधी असं केलंय का ?' तसच पुस्तक मिटून चारपाच मिनिटे स्वस्थ बसले आणि म्हणाले, ' ते खर आहे, पण लाकडाच्या दोन तुकड्यासाठी झगडा करीत बसणं मला आवडत नाही. "

" म्हणता काय ? " भैरव आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

हसत हंसत गोपाळ सरकार एकदोन वेळ मान हालवीत म्हणाला, " ठीक आहे आचार्यमहाशय, ठीक आहे. त्याच दिवसापासून मी समजून चुकलों-झालं-सपल. छोट्यापातीची लक्ष्मी तारिणी घोषालबरोबरच अंतर्धान पावली. "

कांहीं वेळ उगीच राहून भैरव म्हणाला, " पण ते तळ आपल्या घराच्या मागंच आहे ना ? एकवेळ कळवून ठेवलेलं बर. "

गोपाळ म्हणाला, "ठीक आहे ठाकूर, एकदा या ना कळवून. रात्रदिवस पुस्तक घेऊन बसायचं ! आपल्या दायादाची जर इतकी भीति बाळगली, तर विषयसपत्तीचं रक्षण कसं व्हायच ? यदू मुखर्जींची मुलगी—बाई माणूस-पण हें ऐकून ती देखील हंसते. गोविंद गागुलीला मुद्दाम बोलावून त्या दिवशी टिंगल करीत म्हणाली, 'रमेशबाबूंना सागा, की म्हणाव महिन्याच वेतन ठरवून इस्टेट आमच्या हाती द्या ना चालवायला !' यापेक्षा शरमेची गोष्ट आहे का दुसरी ?" एवढेच बोलून गोपाळ रागाने तोंड वाकडें करून आपल्या कामाला लागला.

घरात कुणीच बायको माणूस नसल्यामुळे आंत जायला कुणालाच बंदी नव्हती. भैरव आंत आला तेव्हा त्याला दिसून आले, की रमेश समोरच्या व्हरड्यावर एका मोडक्या इझीचेअरवर पडला होता भैरवाने बोलायला आरंभ केला. इस्टेटीची सर्व व्यवस्था कशा प्रकारे करायची याबद्दल त्याने थोडी प्रस्तावना ज्या वेळी केली, त्या वेळी बदुकीची गोळी लागल्यासारखा चवताळून उठून रमेश म्हणाला, "रोज रोज कसली ही भानगड ! भजवा—"

एकदम रमेश चिडलेला पाहून भैरव घाबरून गेला. भानगडीचा कसला उल्लेख केला ते काही त्याला निश्चित ठरविता येईना. भजवा हा रमेशाचा नोकर. गोरखपूर जिल्ह्यात राहाणारा तो जसा ताकतवान होता तसाच विश्वासूही होता. लाठीबाजींत तो रमेशचा शिष्य होता. लाठी चालवण्यात वाकबगार होण्यासाठीं रमेश आपण स्वतः शिकून त्याला शिकवीत असे.

भजवा हजर होताच रमेशने त्याला एकदम कडक हुकूम दिला, "एकदम सारे मासे काढून आण. जर कुणी अडथळा करायला आला तर त्याच्या झिज्या पकडून त्याला इथं घेऊन ये. आणि नाही आणता आल त्याला-तर निदान त्याच्या दांतांची एक कवळी तरी उडवून ये."

भजवाला हेच पाहिजे होते. तेलांत पकवलेली आपली लाठी आणण्यासाठीं तो एकदम आपल्या खोलींत गेला. हा प्रकार पाहून भैरव घाबरून कापूं लागला. बंगालदेशाच्या अन्नपाण्यावर वाढलेला माणूस, आरडाओरड, शिवीगाळ यांची त्याला पर्वा नव्हती. पण तो मजबूत पेहेलवान परदेशी भय्या न बोलता नुसती मान हलवून निघून गेला, हें पहातांच भैरवाची जीभ भयाने कोरडी पडली. न भुंकणारें कुत्रें चावत असते हें त्याला माहीत होते.

भैरव आला होता तो एवढ्याच उद्देशानें, कीं विशेष कांहीं दंगा मारामारी न

करता भागीचे चार दोन मासे घरी आणण्याचा बाबूनीं हुकूम दिला कीं झालें. या कामीं आपणच कांहीं करावें असा भैरवचा उद्देश होता पण तें कांहीं जमलें नाही शिव्यागाळी करण्यासाठी कोणच निघालें नाहीं. धन्याने नुसती आरोळी ठोकली पण डोळासुद्धां न हलवतां नोकर लाठी आणायला गेला.

भैरव बिचारा गरीब माणूस. फौजदारीच्या भानगडींत पडायचे त्याला धैर्य नव्हते. इच्छाही नव्हती.

थोड्या वेळाने एक भली लाबलचक बाबूची काठी घेऊन भजवा जेव्हा खोलींतून बाहेर आला, लाठी मस्तकाला लावून दुरूनच रमेशला नमस्कार करून तो जेव्हा जायला निघाला, तेव्हां भैरवला एकदम रडें कोसळलें रमेशाचे दोन्ही हात दाबून तो म्हणाला, " थांब रे भजवा, जाऊ नकोस. बाबा रमेश, असली भानगड नको. मी आपला गरीब माणूस. फुकट मरून जाईन."

रागारागानें रमेशने हात सोडवून घेतले. तो आश्चर्यचकित झाला होता. भजवाही परत येऊन उभा राहिला होता. भैरव अगदी रडकुडीला येऊन म्हणाला, " असला प्रकार झाकून राह्यचा नाही. बाबा, वेणीबाबूला कळलं तर तो सारा राग माझ्यावर काढील. माझ्या घरादाराला आग घालील. बाबा रे, तिथं ब्रह्म-देवाची सुद्धा मात्रा चालायची नाहीं."

रमेश मान खाली घालून स्वस्थ बसून राहिला होता. ती गडबड ऐकून गोपाळ सरकार वह्या फेकून आंत आला आणि अदबीने म्हणाला, " काय भानगड आहे ? "

रमेशनें त्याच्या प्रश्नाचे उत्तर दिले नाहीं नुसत्या हाताच्या खुणेने भजवाला आपल्या कामाला जायचा हुकूम करुन तो तसाच आपल्या खोलींत निघून गेला. भैरवीची ती भीतिग्रस्त विपन्नावस्था पाहून त्याच्या हृदयांत कोणत्या प्रकारची भीषण भावना उत्पन्न झाली तें त्याच्या हृदयस्थ देवालाच माहीत.

## ७

" काय रे यतीन, खेळतोयस ? शाळेत गेला नाहींस ? "

" आज नि उद्या, दोन दिवसांची सुट्टी आहे आम्हांला आक्का. "

त्याचे उत्तर ऐकून मावशी तोंड वेंगाडून म्हणाली, " जळली मेली शाळा—महिन्यांतून पंधरा दिवस सुट्टी ! आणि असल्या या शाळेसाठीं पैसे देतेस ! मी

असतें तर आग घातली असती या शाळेला ! " असे म्हणून ती आपल्या कामाला निघून गेली. मावशी म्हणजे सोळा आणे खोट बोलणारी अशी ओरड करणारे खरोखरच चुकत होते. मधून मधून ती केव्हा केव्हां अशी एकाददुसरी खरी गोष्ट बोलून जात असे. आणि केव्हा केव्हा तशीच जरूरी पडली तर खरें बोलायला सुद्धा मुळीच मागे घेत नसे.

धाकट्या भावाला जवळ ओढून घेऊन रमाने विचारले, " कसली रे सुट्टी यतीन ? "

आक्काला अगदीं खेटून उभा राहून यतीन म्हणाला, " आमच्या शाळेवर नवे छप्पर चढवताहेत. मग भिंतीला रग देणार आहेत. किती तरी पुस्तकं आणलीयत. चार पाच खुर्च्या-टेबलं आणि एक कपाट आणलंय— अन् एव्हढ मोट्ठ घड्याळ आणलय. एक दिवस तू पाह्यला ये ना आक्का."

" म्हणतोस तरी काय ? " रमा आश्चर्यचकित होऊन म्हणाली.

" हो ! सगदीं शपथ ! रमेशबाबू आले आहेत ना-त्यांनी दिल आणून-" तो आणखी काही सागणार होता तोंच समोरून मावशी येत असलेली पाहून रमेनें त्याला घाईघाईनें ओढून आपल्या खोलींत नेले.

हळूहळू लाडीगोडीनें एकेक प्रश्न विचारीत रमेशनें शाळेसाठीं काय काय केले याची सारी हकीगत तिने आपल्या भावाकडून काढून घेतली. रमेश रोज शाळेत एक दोन तास शिकवायला स्वतः जात असे असेही तिला कळून आले

मधेंच रमेनें एकदम विचारले" कायरे यतीन, तुला ओळखलं का त्यांनीं ?"

" हो ! " अभिमानाने मान हलवीत यतीन म्हणाला.

" तू काय म्हणून हाक मारतोस त्याना ? "

या वेळीं मात्र यतीन मोठ्या पंचायतींत पडला. हांक मारण्याइतका त्याचा दाट परिचय अजून झाला नव्हता. ज्याना सारेच थरकांप भीत असत, ते हेडमास्तर सुद्धां जो येताच मऊ माजर होऊन जात, त्या व्यक्तीबद्दल मुलाना आश्चर्ययुक्त भीति वाटल्यास नवल कसलें ? हाक मारणे तर दूरच राहो, असे डोळे वर करून रमेशच्या तोंडाकडे पहाण्याची सुद्धा कुणाची छाती नव्हती.

पण आक्काजवळ हें कबूल कसे करावचें ? मुलें बाकीच्या मास्तरना 'छोटेबाबू' म्हणत ते त्यानें ऐकलें होतें. थोडीशी अक्कल खर्ची घालून तो म्हणाला, " आम्ही छोटेबाबू म्हणतों त्यांना. "

पण त्याच्या मुद्रेकडे पहाताच रमेला शका आली. त्याला आणखी जवळ ;वटाळून हसत हंसत ती म्हणाली, " छोटेबाबू म्हणतोस ? अरे ते तुझे दादा ाहेत. वेणीबाबूला ' बडेदादा ' म्हणतोस तस यांना ' छोटेदादा ' म्हणायचं : कसं नाहीं कळत तुला ? "

बिचारा यतीन हर्षभरीत झाला आणि म्हणाला, " ते माझे दादा होतात ोय ? खर सांगतेयस आक्का ? "

" होय तर ! " असे म्हणून रमा पुनः हंसली.

आता यतीनला धरून ठेवणे शक्य नव्हते. केव्हा एकदा जाऊन ही हकिकत ापल्या मित्राना सागेन असे त्याला झालें होते.

पण काय करतो बिचारा--शाळा बंद होती ! दोन दिवस स्वस्थ राहिल्या- ेरीज गत्यतर नव्हते. पण त्याला वाटले, निदान घराच्या जवळपास असलेल्या ुलांना तरी सागावें.

तिचे हात सोडवून घेत तो म्हणाला, " चल जाऊ आक्का ! "

" या वेळीं कुठ निघालीस रे ? " असें म्हणून रमेनें त्याला धरून ठेवले.

आता जातां येत नाहीं असें पाहून यतीन कांही वेळ आंबट तोंड करून वस्थ राहिला आणि मग म्हणाला, " इतके दिवस ते कुठ होते आक्का ? "

रमा मोठ्या प्रेमाने म्हणाली, " ते शिकायला गेले होते--अगदीं लांब ाब गेले होते. आता तूं मोठा झालास किनई, की तुलासुद्धा लांब लाब शिका- ला पाठवायच. पण तिकडे माझ्याशिवाय राहशील का यतीन ? " असे म्हणून तेनें आपल्या छोट्या भावाला हृदयाशीं कवटाळून धरले.

तो लहान मुलगा होता खरा, पण आक्काचा शब्द बदललेला पाहून त्याला ाश्चर्य वाटले तो तिच्या तोंडाकडे पहात राहिला. आपल्या धाकट्या भावावर मेचा अगदीं जीव होता खरा, पण अशा प्रकारे मनावरचा ताबा सुटल्याचे क्षण यापूर्वी तिनें त्याला कधीं दिसूं दिले नव्हते.

यतीननें विचारलें, " छोटेदादाच सार शिक्षण पुर झालं का ग आक्का ? "

त्याच आवाजात रमेनें उत्तर दिले, " हा बेटा, त्याचं शिक्षण आता पुर ालंय. "

" तुला कसं कळलं ? " यतीननें पुनः विचारलें.

उत्तर द्यायच्या ऐवजीं रमेनें नुसता एक सुस्कारा सोडून मान हलवली. खरें

पाहिले तर तिलाच काय—पण गांवातल्या कुणाही माणसाला या बाबतींतली काहीच माहिती नव्हती. तिचे अनुमान कदाचित् खरेही ठरले. जो माणूस एव्हढ्या थोड्या वयांत दुसऱ्यांच्या मुलाऱ्या शिक्षणाबद्दल एव्हढी कळकळ दाखवतो तो स्वतः चागलाच सुशिक्षित असला पाहिजे असे तिला निश्चयपूर्वक वाटले.

यतीनने आणखी आग्रह धरला नाहीं. कारण तितक्यातच त्याच्या डोक्यात एकदम एक प्रश्न उभा राहिला. तो एकदम मधेच म्हणाला, " असं पहा अक्का, हे जर आमचे छोटेदादा, तर आमच्या घरीं का येत नव्हींत ? बडेदादा तर रोज येतात ! "

त्या प्रश्नामुळे तिच्या हृदयाला बाण विधून गेला. तरीही ती हसत म्हणाली, " तू का नाहीं त्याना बोलावून आणीत ? "

" आत्ता घेऊन येतो पहा आक्का ! " असे म्हणून यतीन एकदम उठून उभा राहिला.

" काय वेडा आहेस रे तूं ! " असे म्हणून घाबरून गेलेल्या रमेने दोन्ही हातानीं त्याला कवटाळून धरलें, " नाही बरं यतीन, असं करायच नाहीं. कधीं जायचं नाहीं त्यांना बोलवायला. अगदी कध्धीं कध्धीं नाहीं ! " असे म्हणून तिने मोठ्या आवेशाने त्याला आपल्या हृदयाशीं कवटाळून धरले.

तिच्या हृदयाचे धडधडणे त्याला स्पष्ट ऐकू आले. तो एवढासा मुलगा आश्चर्यचकित होऊन तिच्या तोंडाकडे पहात राहिला.

त्याला वाटलें, आज अक्का अशी काय चमत्कारिक वागते आहे !—छोट्या बाबूना तिनें छोटेदादा म्हणायला सागितले त्यावेळीं त्याच्या मनाला एक निराळीच गती मिळाली होती—पण आता त्याना बोलावून आणणार म्हणताच आक्का एवढी घाबरते का हें त्याला कळेना.

तितक्यात मावशीची मोठी हाक ऐकून यतीनला सोडून रमा ताडकन् उठून उभी राहिली. पहाता पहाता खुद्द मावशीबाईचीच स्वारी दारांत हजर होऊन म्हणाली, " मला वाटल, कीं रमा गेली आहे घाटावर आघोळ करायला. एकादशी असली म्हणून काय झाल—एवढा वेळपर्यंत तेलपाणी केल्याशिवाय का राह्यचं ? तोंड कस अगदीं सुकून गेलय ! "

बळेच हसून रमा म्हणाली, " तू जा आतां मावशी, ही मी निघालें आघोळीला.

" आता केव्हा जाणार आहेस? बाहेर जाऊन पहा ना—वेणीबाबूचीं माणसं माशाची भागी करायला आलीं आहेत. "

माशाचे नांव ऐकताच यतीन एकदम पळत सुटला मावशीच्या नजरेला न येईल अशा रीतीने हळूच पदराने आपला चेहरा पुसून घेऊन रमा तिच्या पाठोपाठ बाहेर निघाली.

अंगणाच्या बाहेर दंगा सुरू होता. खूप मासे पकडले होते. एकावर एक टोपलं रचून ठेवले होते वाटून घेण्यासाठी वेणीबाबू स्वतः आला होता. गावातलीं झाडून सारीं पोरेबाळे आजूबाजूला गोळा होऊन गडबड करीत होतीं.

खोकल्याचा आवाज ऐकू आला, " किती मासे मिळाले रे वेणी ? " असें म्हणत धर्मदास हातीं काठी घेऊन हजर झाला.

" तसे काही विशेष नाहीत ! " वेणीबाबू तोंड वाकडे करून म्हणाला. कोळयाना हाक मारून तो म्हणाला, " आता उशीर कसला आहे रे ! लवकर दोन भाग करून टाका ना "

कोळी आपल्या कामाला लागले.

" काय चाललय ग रमा ? फार दिवसात यायला मिळाल नाहीं म्हटलं एकदा पोरीची खबर घेऊन जाव " असे म्हणत गोविंद गांगुली घरात घुसले.

" याव " रमा म्हणाली आणि ओठ दाबून हंसू लागली.

" कसली ही गर्दी ? " असे म्हणत गांगुली पुढे आला आणि एकदम आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " अरेच्या ! तरीच. बरेच मासे सांपडलेयत वाटतं ? मोठ्या तळयात जाळी फेकली होती वाटत ? "

या प्रश्नाची उत्तरे देण्याची कुणाला जरूरी भासली नाहीं. सारे लोक माशाची वाटणी करायच्या कामाला लागले होते. थोड्या वेळात ते काम पुरे झाले.

आपल्या वाट्याचे मासे नोकराच्या माथी चढवून वेणीबाबू जायला निघाला. जाताना त्याने कोळयाना हळूच डोळा घातला. मुखर्जी मंडळींना माशाची तेव्हढीशी जरूरी नव्हती म्हणून रमेच्या वाट्यातले काहीं मासे आपल्या भागात सामील करून तो जायला निघत होता—तोंच रमेशाचा परदेशी भय्या डोईभर उंच कळकीची लाठी हाती घेऊन अंगणात हजर झालेला पहाताच सारे आश्चर्यचकित झाले. या माणसाचा चेहरा पाहिला की कुणीतरी आपला दुष्मन दावेदार समोर उभा राहिल्यासारखे कुणालाही वाटे. गावचे सारे लहान थोर लोक याला चांगलेच

ओळखत—एव्हढेच नव्हे, तर त्याच्याबद्दल नानाप्रकारच्या अवास्तव दंतकथा हळू हळू जिकडे तिकडे लोकांच्या तोंडीं होऊं लागल्या होत्या.

एव्हढ्या सगळ्या माणसात घरची मालकीण म्हणून त्याने रमेला कसे ओळखून काढले ते त्याचे त्यालाच माहीत. दुरूनच सलाम करून त्याने 'मा–जी' म्हणून हाक मारली आणि तो जवळ येऊन उभा राहिला त्याचा चेहरा कसाही असो पण त्याचा आवाज भयकर होता—अत्यंत भसाडा आणि फुटलेला.

पुन. एकदा सलाम करून हिंदी बंगाली मिश्र भाषेत त्याने थोडक्यात सांगितले, की मी रमेशबाबूचा नोकर असून माशातला तिसरा भाग ताब्यात घेण्यासाठी आलो आहे.

त्याच्या मागणीला काय उत्तर द्यावें हे न सुचल्यामुळे असो, किंवा एकंदरीत आकस्मित मागणी आल्यामुळे असो, उत्तर देणे तिला कठीण गेले तो माणूस वेणीबाबूच्या नोकराकडे वळून म्हणाला, " अरे ए, जाव मत् "

नोकर लोक घाबरले आणि चार पावले मागें हटले अर्धा मिनिटपर्यंत जिकडे तिकडे चूपचाप होते थोड्या वेळाने वेणीबाबू धीर करून थोडा पुढे सरसावला. जिथे होता तिथूनच म्हणाला, " कसला वाटा ? "

भजवाने त्यालाही एक सलाम केला आणि म्हटले, ' बाबूजी, आपको नही पूछा. "

दूर उभी राहिलेली मावशी खणखणीत आवाजाने ओरडली, " कायरे, बाबा, मारणार आहेस वाटतं ? "

भजवा काही वेळ तिच्याकडे पहात राहिला—पण तितक्यातच त्याच्या फुटक्या आवाजाच्या भयंकर आरोळीने सारी वाडी दणाणून गेली. ते हसणे होते त्याचे.

त्याचे हसे थांबले—तो जरा शरमिंदा होऊन रमेला उद्देशून म्हणाला, " मा–जी ?—"

त्याच्या या खोट्या आदबीआड लपलेला बेमुर्वतपणा पाहून रमेला चीड आली. आतां ती बोलू लागली—म्हणाली, " काय पाहिजे तुझ्या बाबूना ? "

रमा रागावली आहे असे पाहून भजवाही एकदम शरमला. आपल्या कर्कश आवाजाला शक्य तितका कोमलपणा आणून त्यानें आपल्या मागणीचा पुनरुच्चार केला.

पण आता त्याच्या मागणीचा काय उपयोग होता ? माशाचे वाटे होऊन ते

देऊन टाकण्यात आले होते. एव्हढ्या लोकाच्या समोर पड खायला रमेची तयारी नव्हती म्हणून ती तोंड वेगाळून म्हणाली, " यांत तुझ्या बाबूची वाटणी नाहीं. त्याना सांग, जे काय करायचे ते करून घ्या. "

' बहोत अच्छा मा–जी ! " असे म्हणून एक मोठा थोरला सलाम करून भजवानें वेणीबाबूच्या नोकराना जायला हाताने खूण केली, आणि एक शब्द-सुद्धा न बोलता तो स्वतःही जायला निघाला. त्याचे ते वर्तन पाहून सर्वाना आश्चर्य वाटले जाता जाता थाबून रमेकडे पाहून आपल्या हिंदी–बगाली मिश्र भाषेत त्याने तिची क्षमा मागितली आणि म्हटले, " माजी, लोकानी सागितल म्हणून तळयातले मासे काढून आणायला बाबूजीनी मला हुकूम केला होता. आम्ही कुणी मांसमाशाना शिवतसुद्धा नाही पण—" स्वतःच्या वक्षस्थळावर हात मारून तो म्हणाला, " बाबूजीच्या हुकुमान आज हा जीव तळयाच्या पाळीवरच खर्ची पडला असता. पण रामजीन खैर केली बाबूजीचा राग ओसरला मला हाक मारून ते म्हणाले, ' भजवा, जा. या तळयात आमचा भाग आहे कीं नाही ते मा जीना–विचार—' " असे म्हणून मोठ्या अदबीने लाठीवर लाठीसह दोन्ही हात वर उचलून त्यानें रमेला नमस्कार केला आणि म्हटले, " बाबूजी म्हणाले, ' कुणी काही म्हणो भजवा, मा–जींच्या तोंडून केव्हाही झूठी बात बाहेर येणार नाही हे मला पक्कं माहीत आहे दुसऱ्याच्या वस्तूला ती हातसुद्धा लावणार नाहीं.' " असे म्हणून मोठ्या अदबीने पुनः पुन. नमस्कार करीत तो बाहेर चालता झाला.

तो निघून जाताच बायकी आवाजाचा आव आणून वेणीबाबू म्हणाला, " अशा रीतीने हा इस्टेट साभाळणार ! आज तुझ्यासमोर प्रतिज्ञा करतो रमा, यापुढ या रमेशला इथल्या एका तनसडीला सुद्धा हात लावायला देणार नाहीं ! " असे म्हणून आनदानें बेहोष होऊन तो हो हो करून सारखा हसत सुटला

पण रमच्या कानीं त्यातला एक शब्दही पोचला नाही. ' मा–जीच्या तोंडून केव्हाही झूटी बात बाहेर येणार नाहीं. ' हे भजवाचे शब्द तिच्या कानात लाखो करताळयाच्या आवाजानें झणझणू लागल्यामुळे तिचे मस्तक सुन्न होऊन गेले होतें. तिचा गौरवर्ण चेहरा एक क्षणभरच नाबडा–लाल होऊन लगेच एकदम इतका पाढरा फटक पडला, की जसे काही सारे रक्त तिच्या देहातून नाहीसे होऊन गेलें होते. आपला चेहरा अशा परिस्थितीत दुसऱ्याला दिसू नये म्हणून डोक्यावरचा पदर आणखी पुढें ओढून ती एकदम तिथून निघून गेली.



“ काकू ! ”

“ कोण रमेश, ये बाबा, असा इकडे ये. ” असे म्हणून विश्वेश्वरीने घाई-घाईने ऐक चटई आथरली.

आत पाऊल ठेवताच रमेश एकदम चमकला. काकूच्या शेजारीं जी बाई बसली होती तिचा चेहरा जरी त्याला दिसत नव्हता तरीही त्याला कळून आलें—की ती रमा होती. मावशीला पुढं घालून काकूचा अपमान करायला तिला काही वाटले नाही—आणि आता पुनः निर्लज्जपणे घरात घुसून काकूना अगदीं खेटून बसली आहे असे पाहून त्याला उद्वेगपूर्ण असमाधान वाटले.

रमेश एकाएकी आल्यामुळे रमेला देखील चमत्कारिक वाटल्यावाचून राहिले नाही. कारण ती नुसती एक ‘ गावची मुलगी ’ नव्हती. रमेशबरोबर तिचे नाते अशा प्रकारचे होते, की अपरिचित स्त्रीप्रमाणे डोक्यावरील पदर पुढे ओढून लाजणेही तिला योग्य वाटत नव्हते—किंवा तसे न करणेही तिला पटत नव्हते.

त्याशिवाय त्या दिवशी तळ्यावर माशांच्या वाटणीबद्दल जो दगा झाला, तोही तिला आठवत होता. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन ती आडोशाला जाऊन राहिली.

रमेशने त्या बाजूकडे पाहिलेही नाहीं. तिथे कुणी आहे किंवा नाही याची खातरसुद्धा न धरता तो शांतपणे येऊन चटईवर बसला आणि म्हणाला, “काकू !”

“ या भर दुपारी अचानक कुठं आलास रमेश ? ” काकू म्हणाली.

‘ दुपारी आल्याखेरीज तुमच्याजवळ बसून बोलायला मिळणार आहे कुठं ? ” रमेश म्हणाला, “ काम फार आहेत ना तुम्हाला ? ”

कांहींच न बोलता काकू नुसती हंसली. रमेशही थोडेसे हसून म्हणाला “ फार वर्षांपूर्वी—एकदा लहानपणी तुमचा निरोप घ्यायला आलो होतों. आता पुनः तसाच आलों आहें. मला वाटतं, ही आपली शेवटचीच भेट आहे काकू. ”

चेहऱ्यावर हसण्याचा आव आणला होता तरी त्याच्या हृदयाची व्यथा त्याच्या सद्गदित आवाजात उघड होत होती. दोघेंही आश्चर्यचकित झाली.

“ द्दडापिडा टळो ! असं कधीं झालंय ! ” असे म्हणताना विश्वेश्वरीचे दोन्ही डोळे पाण्याने भरून आले.

रमेश पुनः नुसता हसला.

मोठ्या ममताळूपणानें विश्वेश्वरीनें विचारले, " कां बर ? प्रकृतिला बर का वाटत नाहीं ? "

स्वतःच्या मजबूत शरीरयष्टीकडे एक दोन वेळ पाहून रमेश म्हणाला " उत्तरे-कडच्या डाळरोटीवर वाढलेला हा देह–याला काय होणार आहे काकू ? तस नव्हे–प्रकृति अगदीं ठीक आहे—पण या गावात यापुढ एक घटकाभरसुद्धा आपला निभाव लागणार नाही अस माझ्या जिवातला जीव मला पुन. पुनः सागतो आहे "

प्रकृति बरी आहे असे ऐकताच विश्वेश्वरीचा जीव खालीं पडला हसतमुखाने ती म्हणाली, " इथ तुझा जन्म झाला, इथ निभाव लागणार नाहीं अस का म्हणतोस बाबा ? "

रमेश मान हलवीत म्हणाला, " ते मला सागायच नाही. तुम्हाला सार काही माहीत आहे हे मी जाणतों. "

एक क्षणभर उगीच राहून विश्वेश्वरी गभीरपणे म्हणाली, " सार काही नसल तरी थोडबहुत मला माहीत आहे खर. पण तेव्हढ्याचसाठीं मी म्हणते, कीं तू इथून कुठं जाता कामा नयेस रमेश. "

" का जाता नये काकू ? इथ तर मी सर्वाना नकोसा झालोय. " रमेश म्हणाला.

काकू म्हणाली, " नकोसा झाला असलास तरी देखील मी काही तुला इथून जाऊ द्यायची नाही आताच ही डाळरोटीच्या देहाची बढाई मारलीस, ती काय पळून जाण्यासाठी ! "

रमेश उगीच राहिला. आज त्याच्या अतःकरणात गावगगेविरुद्ध विद्रोहाची आग पेटून उठली होती त्याला एक विशेष कारण झाले होते. रेल्वे स्टेशनकडे जायला गांवातून जो रस्ता होता तो आठ दहा वर्षांपूर्वी आलेल्या पुरामुळे केव्हातरी ढासळून पडला होता. तेव्हापासून दिवसेदिवस तो खड्डा वाढत वाढत जाऊन फार मोठा झाला होता त्यात पाणी साचत होते आणि त्यामुळे रस्ता पार होऊन जायला लोकाना फार कष्ट पडत असत. इतर वेळीं वोतर सावरून पाय हळू टाकून लोक कसेबसे या रस्त्यातून पार होत, पण पावसाळ्यात मात्र लोकाच्या हालांना पारावार नसे एकाद्या वर्षी एकदोन बाबू टाकून एकाद्या वर्षी मोडून पडलेल्या ताडाचे खोड उलटें टाकून लोक कसेबसे सावरून सावरून हातपाय साभाळीत—किंवा धक्के खात खात पलीकडे जाऊन पोंचत असत. एव्हढे कष्ट होत होते तरीही गावकऱ्यानीं आजपर्यंत हा रस्ता दुरुस्त करायचा कोणताच प्रयत्न केला नव्हता.

दुरुस्तीसाठी चार पैसे खर्च होणार होते. स्वतः न देता हे पैसे वर्गणी करून मिळविण्याचा गेल्या आठ दिवसात रमेशनें प्रयत्न केला. पण चार दोन आण्या-पलीकडे कुणीच पैसा बाहेर काढीनात.

एव्हढेच नव्हे, तर मजल यापुढे गेली होती. त्याच दिवशीं सकाळीं तो फिरायला निघाला असताना वाण्याच्या दुकानीं चाललेले भाषण सहज त्याच्या कानीं पडले. एकजण दुसऱ्याला सागत होता, " एक पैसासुद्धा देऊं नकोस पाहिलस ना ? स्वतःच्याच गरजा फार आहेत. पायात बूट घालून कसा थाटात फिरतो पाहिलंस ना ? कुणी काही देऊं नका, म्हणजे आपणच तो खिशातले पैसे बाहेर काढील शिवाय अस पहा, आजवर हा कुठ होता इथ ?–काय आम्ही स्टेशनवर जात नव्हतो कधी ? "

कुणी एकजण म्हणाला, " पुरे झाल आता हे. "

चतर्जी महाशय म्हणाले, " जरा त्याच्या डोक्यावरून हात फिरवून शितळा देवीच मंदीर ठीकठाक करून घेतल पाहिजे. ' बाबूजी बाबूजी ' म्हणून थोडीशी खुषामत करता आली की बस्स ! "

तेव्हांपासून सारखी त्याच्या अगाची आग होत होती.

आणि काकूनेही त्याच वर्मावर घाव दिला. ती म्हणाली, " तो रस्त्यातला खड्डा भरून काढणार होतास त्याच काय झाल ? "

रमेश चिडून म्हणाला, " ते कांहीं व्हायचं नाही काकू. एक पैसा द्यायला सुद्धा कुणी तयार नाही. "

विश्वेश्वरी हसून म्हणाली, " लोक देत नाहीत म्हणून चालायचं नाहीं बाबा. तुझ्या वडिलानीं तुझ्यासाठीं माग ठेवलंय काहीं—एव्हढ्या कामापुरते पैसे तुला स्वतःलाच देता येतील कीं ! "

रमेश एकदम चिडून उठून म्हणाला, " मी कां देऊ ? त्या शाळेसाठीं निष्कारण पैसे खर्ची घातले त्याचाच मला पश्चात्ताप होतोय. या गावासाठी काहीं कुणी करता नये—" रमेकडे तीक्ष्ण दृष्टीने पहात तो म्हणाला " या लोकाना काहीं दिल तर गाढव ठरवतात—चागल केल तर गरजू ठरवतात. सहन करणा सुद्धा महापाप आहे—म्हणतात, भिऊन पळाला ! "

काकू एकदम हंसत सुटली. पण रमेशचा चेहरा एकदम गोरामोरा झाला.

रागारागानें रमेश म्हणाला, " हसता काय काकू ?

"हसूं नको तर काय करूं ?" असे म्हणून एक मोठा सुस्कारा सोडून काकू म्हणाली, "म्हणूनच मी म्हणते, एवढ्यचसाठी तू इथ राहिलं पाहिजे राग आला म्हणून आपली जन्मभूमि टाकून का जायच आहे रमेश ? मला सांग. राग करायच्या लायकीचीं तरी ही माणसं आहेत का ?–" ती क्षणभर थांबली आणि जशी काहीं आपल्याशीच बोलू लागली, "किती दुःखी आहेत ही माणस ! किती दुबळीं आहेत ! तुला जर बरोबर कल्पना करता येईल रमेश, तर या लोकांवर रागावल्याबद्दल तुझी तुलाच लाज वाटेल. देवाला दया आली आणि त्यान तुला इथ ओढून आणल. याच लोकात मिसळून तुला राहिल पाहिजे बाबा."

' पण याना मी नकोसा झालोय ना काकू ?"

काकू म्हणाली, "एव्हढ्यावरूनच नाही का तुला कळत, की त्याच्यावर राग करण्यात हशील नाही म्हणून ? एवढंच काही नव्हे—सारा गाव धुंडाळून पहा, सारे एक माळेचे मणी.' एकदम रमेकडे वळून ती म्हणाली, "मान खाली घालून उगीच बसलीस का ग ?—काय रे रमेश, तुम्ही दोघ भाऊबहिणी बोलत नाही वाटत एकमेकाबरोबर ? नाही ग बाई, हें बर नव्हे ! तुझ्या आणि याच्या बापाच्यामधे जे कांहीं होऊन गेल ते भावजींच्या मृत्युबरोबर संपल. ती जुनीं वैर कवटाळून दोघानी दोन दिशेला तोंड करून बसून चालायच नाही."

खालच्या मानेनेच रमा चाचरत म्हणाली, "मला तस व्हायला नको काकू ! रमेशदादा—"

एकदम रमेशाच्या संतापलेल्या आवाजाखाली तिचा नाजूक आवाज झाकून गेला तो एकदम उठून उभा राहून म्हणाला, "या भानगडीत तुम्ही पडूं नका काकू. कसाबसा परवा तिच्या मावशीच्या हातून बचावलों. आज पुनः हिन जर तिला इथ पाठवून दिली, तर ती तुम्हाला चावून, गिळून, खाऊन, पचवील तेव्हा घरी जाईल !" एव्हढेच बोलून पुढल्या उत्तराची अपेक्षा न करता रमेश तडक बाहेर निघून गेला.

मोठ्याने हाक मारून विश्वेश्वरी म्हणाली, "जाऊं नकोस रमेश. मी काय म्हणते ते ऐक आधीं."

दाराबाहेर पडलेला रमेश म्हणाला, "नाहीं काकू, गर्वाच्या ताठ्यान तुमच्या सारख्याना सुद्धा पायाखालीं तुडवायला ज्याना काहीं वाटत नाहीं, त्याच्या बाबतींत एक शब्द सुद्धा बोलू नका." पुढील उत्तराची वाट न पहाता तो निघून गेला.

काकुळतवाणा चेहरा करून रमा विश्वेश्वरीच्या तोडाकडे पहात होती. तिला एकदम रडूं कोसळले. ती म्हणाली, " हा दोष मला का काकू ! मी का मावशीला सांगते तसं वागायला ? त्याचा दोष मला का म्हणून ? "

तिचा हात ओढून आपल्या हाती धरून काकू वात्सल्यानें म्हणाली, " तू सागत नाहीस हे खर आहे, पण त्याचा दोष तुझ्यावरही येतो हे काहीं खोटे नाहीं पोरी. "

दुसऱ्या हाताने डोळे पुशीत रुसव्याच्या स्वरात रमा ताठ्याने म्हणाली, ' माझा दोष कसा ? एव्हढ म्हटल्या एव्हढं सुद्धा मला माहीत नव्हत मग निष्कारण मला दोष देऊन का यान माझा अपमान केला ? "

विश्वेश्वरीने या बाबतीत अधिक चर्चा केली नाही. गभीरपणे ती म्हणाली, " सर्वांना आतल्या गोष्टो तर कळत नाहींत ना पोरी ? जाणून बुजून तुझा अपमान करावा म्हणून काही त्याला वाटलं नव्हत हे मी सागेन. तुला माहीत नसेल,—पण तुझ्यावर त्याचा किती विश्वास आहे,——केव्हढी श्रद्धा आहे, ते गोपाळ सरकारच्या तोडून मला कळल आहे. त्या दिवशी चिंचेच झाड तोडून दोघानीं दोन वाटे करून घेतले त्यावेळी कुणी सागितल, तरीसुद्धा त्यान आपल्या वाट्याचा हट्ट धरला नाही. सर्वासमक्ष त्यान हसत सागितल, ' काही काळजी करूं नका. जिथ रमा आहे तिथ माझ्या हक्काच्या वाट्याची मला काळजी नाही. दुसऱ्याची वस्तु ती कधीसुद्धा बळकावून बसायची नाही ' एव्हढे हे झगडे भाडण झालीं तरी देखील तुझ्यावर त्याचा विश्वास आहे हे मी खात्रीन सागेन नसता, तर त्या दिवशी तळयावर——"

बोलता बोलता विश्वेश्वरी मधेच थाबली आणि रमेच्या गोऱ्यामोऱ्या झालेल्या चेहऱ्याकडे स्तब्धपणे पहात राहून म्हणाली, " आज तुला एक गोष्ट सागते पोरी ! धन-दौलत राखायच मोल केव्हढही मोठ असो रमा, पण या रमेशाच्या प्राणाच मोल त्यापेक्षा फार भारी आहे. कोणत्याही वस्तूच्या लोभान किंवा कुणाच्याही सागण्यान तुम्ही त्याच्यावर चोहीकडून घाव मारमारून त्याचा नाश करूं नका. तस काहीं केलत तर जो या गावाचा नाश होईल त्याची भरपाई केव्हांही व्हायची नाहीं हें मी प्रतिज्ञेवर सागते "

रमा उगीच बसून राहिली——उलट एक शब्दही बोलली नाहीं. विश्वेश्वरीही कांहीं बोलली नाही.

थोड्या वेळाने भारावलेल्या आवाजाने रमा म्हणाली, " उशीर झाला. आतां घरीं जातें काकू. " असे म्हणून विश्वेश्वरीला नमस्कार करून ती निघून गेली.

९

रमेशला कितीही राग आलेला असेना—पण तो घरीं जाऊन पोहोचेपर्यंत ती त्याची रागाची जळजळ निवून थड झाली. पुन. पुनः त्याला वाटू लागले, सरळ गोष्टीसाठी उगीच किती त्रास करून घेतला हा ! वास्तविक राग करायचा कुणावर ? ज्याची मने इतकी स्वार्थी, खर कल्याण कशात आहे हे ज्याना डोळे उघडून पाहता येत नाही, शिक्षणाच्या अभावामुळे जे इतके आंधळे झाले आहेत, की शेजाऱ्याचे बळ मोडून टाकणे म्हणजे स्वत.चे बळ वाढविणे असे ज्याना वाटतें, चागलें करायला जाणाराला जे सशयाच्या नजरेनें पाहातात, त्याच्यावर रागावण्यासारखा दुसरा वेडेपणा कुठला ?

दूर शहरात असताना पुस्तके वाचून, हकीकती ऐकून, नुसती कल्पना करून, त्याला असे वाटत होते, की आम्हा बगाल्याकडे दुसरे काही नसले, तरी सादीकोपऱ्यात असलेल्या खेड्यातील ती शाति आणि ते स्वातंत्र्य, माणसानी गजबजलेल्या शहरात नाही तिथे अल्पसतुष्ट असलेले खेडवळ लोक सहानुभूतीनें बिरघळतात. एकाच्या दुःखाचा धक्का दुसऱ्याच्या हृदयाला बसतो. एकाच्या सुखाने दुसरा अनाहुत उत्सव करू लागतो खरखुर ऐश्वर्य कुठे ठाण माडून बसलें असेल तर ते तिथेंच—खेडवळाच्या हृदयात.

पण केव्हढा भयानक भ्रम ! एव्हढा विरोध, एव्हढा विघ्नसंतोषीपणा शहरातसुद्धा दिसून येत नाही शहराच्या गडबडीत रस्त्याच्या बाजूला जेव्हा एकादे पापाचे चिन्ह त्याच्या नजरेला पडे त्यावेळीं त्याला वाटे, की कसाबसा आपल्या त्या जन्मभूमीच्या छोट्या गावी जाऊन पडलो तर असले हे देखावे पाहायचं तरी टळेल. सर्वापेक्षा मोठा असा जो धर्म, तो तिथे आहे. समाजाचे चारित्र्यही त्याच ठिकाणी अजून निर्वेध टिकून राहिले आहे.

पण कुठे आहे ते चारित्र्य ? आमच्या प्राचीन सादीकोपऱ्यातल्या खेड्यातला कुठे आहे तो सजीव धर्म ? धर्माच्या मधला जर प्राणच निघून गेला आहे तर त्याचे हें मढे कशाला सडत ठेवलें आहे ? या सडलेल्या, नासलेल्या हतभागी मढ्याला कवटाळून, तोच यथार्थ धर्म आहे असे समजून खेड्यांतला समाज

त्याच्या विषारी घाणेरड्या कुश्चळतेमुळे अधोगतीला जात चालला आहे. आणि सर्वात मनाला धक्का देणारा परिहास हा, कीं शहरात जातिधर्म नाहीं असे म्हणून हेच लोक शहरी माणसाकडे तुच्छतेच्या आणि अश्रद्धेच्या नजरेने पहात आहेत.

घरात पाऊल टाकताच रमेशाला दिसून आले, कीं आंगणाच्या एका बाजूला एक प्रौढ बाई एका ११-१२ वर्षाच्या मुलाला घेऊन घाबरटपणे बसली होती. तो येताच ती उभी राहिली. तिची हकिकत त्याला जरी काहीच माहित नव्हती तरी त्या मुलाचा नुसता चेहरा पाहूनच रमेशच्या हृदयाला बाण बसला गोपाळ सरकार चंडी मंडपाच्या व्हराड्यांत बसून लिहीत होता तो पुढे आला आणि म्हणाला, " दक्षिणपाड्यातल्या द्वारिक ठाकूरचा हा मुलगा. आपल्याकडे काहीं भिक्षा मागायला आला आहे. "

भिक्षेचे नाव ऐकताच रमेश एकदम उसळून म्हणाला, "मी घरीं आलों तो काय सगळ्याना नुसता भिक्षाच घालायला ? गावात काय आणखी माणंस नाहींत ?"

गोपाळ सरकार जरा वरमून म्हणाला, " ते खर आहे बाबूजी, पण धनीसाहेब कधींच कुणाला रिकामा परत पाठवीत नसत—म्हणूनच संकटात सापडलेलीं माणस या इथ धाव ठोकतात. "

मुलाकडे एकदा पाहून त्या बाईला उद्देशून तो म्हणाला, "कामिनीची आई, याचा देखील दोष काहीं कमी नाहीं बाई ! जिवंत असताना प्रायश्चित करू दिल नाहीं. आता कुणी प्रेत उठवीत नाहीत म्हणून पैशासाठीं दारोदार हिंडायचं ? घरीं कांही हंडी-मडकी नाहीत का ? "

कामिनीची आई जातीने गवळण होती. या मुलाची ती शेजारीण नकारार्थी मान हलवून ती म्हणाली, " खर वाटत नसल तर तिथ येऊन पहा. माझ्याकडे देखील काही असतं तर बापाच प्रेत घरीं टाकून पोराला भीक मागायला आणलं नसतं इथं. प्रत्यक्ष पाह्यल नसल तरी ऐकलं आहे ना तुम्ही ? गेले सहा महिने माझ्याकडे जे काहीं होतं नव्हतं ते याच्यापायीं खर्ची घातल. म्हटल, हाती आहे तोंवर डोळ्यादेखत ब्राह्मणाचीं पोरबाळं खाण्यापायीं कां मरूं द्यावीं ? "

एकदर भाषणावरून रमेशला साधारणपणे अनुमान करता आले

गोपाळ सरकार हकिकत स्पष्ट करून सांगू लागला, " या मुलाचा बाप— द्वारिक चक्रवर्ति सहा महिने दम्याने आथरुणाला खिळला होता. आज सकाळींच तो मेला. प्रायश्चित केलं नाहीं म्हणून कुणी प्रेताला शिवायला तयार नाहींत आणि

उत्तरक्रिया तर झाली पाहिजे या दरिद्री ब्राह्मणासाठीं आपल्या कडे होत नव्हतं ते गेल्या सहा महिन्यात या कामिनीच्या आईन खर्ची घातलं. आता तिच्या-कडेही काहीं राहिलं नाही. एवढ्यासाठींच ती मुलाला घेऊन आपल्याकडे आली आहे.

काहीं वेळ थांबून रमेशने विचारलें, " आता दोन वाजायला झाले. प्रायश्चित्त केलं नाही तर प्रेत तसच का टाकून ठेवणार ? "

सरकार हसून म्हणाला, " दुसरा काय उपाय आहे ? शास्त्रविरुद्ध तर वागता येत नाही ? काहीं झालं तरी प्रेत ठेवून चालत नाही कस ना कस तरी करून याना उत्तरकार्य तर केलं पाहिजे ? म्हणून भिक्षेला निघाला आहे ह कामिनीची आई, आणखी कुठं गेली होतीस ? "

मुलाने मूठ उघडून एक चवली आणि चार पैसे दाखवले.

कामिनीची आई म्हणाली, " चवली मुखर्जीनीं दिली आणि चार पैसे हलदार महाशयानीं दिले. काही ना काहीं करून नऊ पावल्या तरी मिळाल्या-शिवाय भागायचं नाही. तेव्हा बाबू जर—"

रमेश एकदम म्हणाला, " तुम्ही आता सरळ घरीं जा. आणखी कुठंही जाऊ नका. मी माणस पाठवून सारी व्यवस्था करवतों. "

त्या दोघाना पाठवून देण्यात आले. अत्यत व्यथित मुद्रेनें गोपाळ सरकारच्या चेहऱ्याकडे पहात रमेशनें विचारले. " अशा गरिबाचीं किती घर या गावात आहेत ? "

सरकार म्हणाला दोन तीन आहेत. जास्त नाहींत. यांची तशी आमटीभात मिळायपुरती सोय होती पण एका झाडाच्या बाबतीत द्वारिक चक्रवर्ती आणि सनातन हाजरा या दोघामध्ये झगडा सुरू झाला. पांच वर्षात दोघेही खलास झाले—" जरा हलक्या आवाजात तो म्हणाला, " एवढ्यावर पाळी आली नसती, पण आमचे बडेबाबू आणि गोविंद गांगुली या दोघानीं त्याना भरीला घालून ही स्थिति आणली. "

" बर मग पुढं ? "

सरकार म्हणाला, " पुढ आमच्या बड्याबाबूकडे दोघाच्याही घरचं सार काही गळाभर गहाण पडल. गेल्या वर्षी व्याजमुद्दल आकारून त्यानीं सार विकत घेतल. ही कामिनीची आई जातीन शूद्र खरी पण या संकटाच्या प्रसगीं तिन या ब्राह्मणासाठीं जें काहीं केलंय त्यास तुलना नाहीं. "

एक मोठा सुस्कारा टाकून रमेश उगीच राहिला.

गोपाळ सरकारला पाठवून त्यानें पुढील सर्व तजवीज करायची व्यवस्था केली. तो आपल्याशीच म्हणाला, " काकू, तुझा हुकूम मला शिरोधार्य आहे. इथ मेलों तरी हरकत नाहीं, पण हे दुर्दैवी गांव सोडून जायच यापुढ मनात सुद्धा येऊं देणार नाहीं. "

# १०

तीन महिने होऊन गेले. एके दिवशीं सकाळीच, तारकेश्वरला ज्या पुष्करिणीला दुग्ध पुकुर ( दुग्धपुष्कर ) असें म्हणतात त्या तलावाच्या पायऱ्यावर रमेश आणि एक स्त्री याची एकाएकी नजरानजर झाली. अशा प्रकारे चमकून एक क्षणभर तो लाज सोडून तिच्या अनावृत्त चेहऱ्याकडे पहात राहिला, की तसाच रस्ता सोडून बाजूला सरायचे मनात आणणें तिला सुद्धा अशक्य झाले.

त्या स्त्रीचे वय वीस वर्षांपेक्षा जास्त नसावे. स्नान करून ती वर येत होती. हातातली पाणी भरलेली घागर तिनें खाली ठेवली. तशीच ओलेत्याने आपल्या बाहूनीं आपले वक्षस्थळ झाकून खालच्या मानेने ती हळूच म्हणाली, " आपण इकडे कुठ ? "

रमेशच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही–पण त्याचा सकोच सहसा नाहींसा झाला. एक बाजूला सरकून उभा राहून त्याने विचारले, " मला ओळखतां का आपण ? "

ती स्त्री म्हणाली, " ओळखते. आपण तारकेश्वरला केव्हा आलात ? "

रमेश म्हणाला, " आज पहाटे. माझ्या मामाच्या घरची बायका मंडळी येणार होती. पण ती कुणी आलीं नाहीत "

" इकडे कुठ राहता ? "

" कुठच नाही. मी यापूर्वी इकडे कधी आलों नव्हतो. पण आजच्या दिवसापुरते कुठ तरी राहिल पाहिजे ! कुठ तरी जागा पाहीन म्हणतो."

" बरोबर कुणी नोकर आहे का ? "

नाही. मी एकटाच आहे. "

' ठीक काही हरकत नाही. " असे म्हणून त्या स्त्रीनें तोंड वर करून पाहिलें. दोघाचीही दृष्टादृष्ट झाली. पुनः तिने नजर खाली केली. नंतर थोड्या वेळानें

मनाशीं काहीतरी ठरवीत ती म्हणाली, " तर मग माझ्याबरोबर चला. " असं म्हणून घागर उचलून घेऊन ती जायला निघाली.

रमेशला मोठे संकट पडले. तो म्हणाला, ' ठीक आहे. मी येतो तशी काही हरकत नसती तर आपण मला बोलावलच नसत. आपल्याला मी ओळखत नाहीं असच काहीं म्हणता यायच नाहीं. पण चागलस आठवत नाहीं. आपला परिचय द्याल का ? "

" तर मग देवळाबाहेर जरा वाट पहा. मी पूजा संपवून येते. जाता जातां बोलू " असे म्हणून ती स्त्री देवळाकडे निघून गेली.

रमेश स्तब्धपणे नुसता पहात राहिला. ओल्या वस्त्रातून फुटून बाहेर पडणारे तिचे उद्दाम यौवन पाहून तो मुग्ध झाला होता. तिचा चेहरा, ठेवण, प्रत्येक पदक्षेपसुद्धा रमेशला परिचित वाटत होता. पुष्कळ दिवसांपासून बंद होऊन गंजलेला आठवणीचा दरवाजा काहीं केल्या उघडत नव्हता.

पूजा सपवून अर्ध्या तासानतर जेव्हा ती बाहेर आली तेव्हा रमेशने पुनः एकदा तिचा चेहरा पाहून घेतला पण अपरिचितपणा उंबरठा त्याला ओलाडता आला नाही.

रस्त्याने जाता जाता रमेशने विचारले, " बरोबर कुणी माणस नाहींत का आपल्या ? "

" नाहीं " तिने उत्तर दिले " मोलकरीण आहे ती बिऱ्हाडी कामांत गुंतली आहे. मी मधून मधून इथ येत असते—मला इथली चागली माहिती आहे "

" पण मला काय म्हणून बरोबर नेता आहात तुम्ही ?

क्षणभर थाबून रस्ता चालत असतांना ती म्हणाली, आपले जेवणाखाणाचे हाल होतील म्हणून '—मी रमा ! "

* * *

समोर बसून तिनें त्याला जेवायला घातले.–पान–विडा दिला. वामकुक्षीसाठीं स्वतःच्या हाताने सतरजी पसरून रमा निघून गेली.

बिछान्यावर पडून डोळे मिटून रमेश विचार करीत होता. तेवीस वर्षाचे जीवन या एका क्षणात आमूलाग्र बदलून गेलें असे त्याला वाटूं लागले. लहानपणापासून त्याचे जीवन परदेशीं—दुसऱ्याच्या घरी गेले होते. जेवणे म्हणजे भूक भागवणें, या पलीकडे जेवायला बसण्यात काहीं विशेष आहे असें त्याला यापूर्वी माहीत

नव्हते. आज अकल्पित रीतीने आलेल्या या योगामुळे त्याला जेवणानंतर एक प्रकारची तृप्ति वाटली. त्याचे सारे मन माधुर्यपूर्ण आश्चर्याने भारून गेले.

त्याच्या जेवणाची काही विशेष नजवीत रमेला करता आली नव्हती. रोजचाच आमटीभात त्याला घालावा लागला होता. तिला फार काळजी पडली होती, की त्याला हे असले जेवण जाणार नाहीं आणि मागाहून आपली निष्कारण चार-चौघात निंदा होईल.

वा रे लोक ! वा रे ही लोकाची निंदा ! त्याच्या खाण्याची गैरसोय होईल असे तिला वाटले होते ! त्या कल्पनेमुळे अंतराच्या अंतरात जी कळकळ अचानक जागी झाली तीमुळे तिचा संकोच आपोआप दुरावला. म्हणूनच त्याला मुद्दाम ओढून या जागी आणणे तिला भाग पडले. स्वतःपासूनच ही गोष्ट कशी लपवून ठेवायची ? आज लाज धरण्याचे काही कारण नव्हते म्हणूनच नित्याप्रमाणे ती दूर राहिली नाहीं. जेवणखाणात उणीव भासू नये एवढ्यासाठीच, तो जेवीत असताना ती येऊन समोर बसली. त्याचे जेवणखाण निर्विघ्नपणे आटोपल्यावर त्याच्या भुकेच्या तृप्तीच्या ज्या ढेकरा रमेला आल्या, त्या रमेशाच्या तृप्तीपेक्षा किती जास्त समाधान देणाऱ्या होत्या ते एका सर्वज्ञ परमेश्वरालाच माहीत.

दिवसा झोप घेण्याची रमेशला सवय नव्हती. पडल्या पडल्या समोरच्या खिडकीतून तो पहात होता. पावसाळ्याच्या सुरवातीचे काळे सावळे तरुण मेघ माध्यान्हीच्या आकाशात गर्दी करीत होते. आपली कुणी माणसे येणार आहेत याची त्यावेळी त्याला आठवणसुद्धा नव्हती

एकाएकीं रमेचा नाजुक आवाज त्याच्या कानी आला. दरवाजाबाहेर उभी राहून ती बोलत होती, " आज घरी जाण होत नाही तेव्हा इथच रहाव म्हटलं. "

घाईघाईनें उठून बसून रमेश म्हणाला, " पण घरच्या मालकाची अजून गाठ पडली नाही त्यानी कुणी रहा म्हटल्याशिवाय राहू कसा ? "

तिथूनच रमेने उत्तर दिलें, " घरच्याच मालकाचं सागणं आहे हें ! हे घर माझच ! "

आश्चर्यचकित होऊन रमेशनें विचारलें, " या गावीं तुझं घर काय म्हणून ? "

रमा म्हणाली, " हें स्थान मला फार आवडतं. म्हणून मधून मधून इथ येऊन राहातें. सध्यां इथं माणसाची फारशी गर्दी नाही—पण केव्हा केव्हा अशी वेळ येते, कीं पाय ठेवायला जागा राहात नाहीं इथ. "

रमा आपल्याशींच हसली. रमेशनें पुनः विचारलें, " तारकनाथवर तुमची फार भक्ति आहे वाटत ? "

रमा म्हणाली, " तशी भक्ति असायला भाग्य हव. जिवात जीव आहे तोंवर प्रयत्न करायचा—एव्हढच ! "

रमेशने अधिक काहीं विचारले नाहीं. रमा दाराला टेकून तिथेच बसली. तिने विचारले, " रात्री आपण काय खाल ? "

रमेश हंसून म्हणाला, " जे मिळेल ते खाईन. काय खायचं आहे याची भावना जेवायला बसेपर्यंत माझ्या मनात येत नाही. म्हणूनच आचाऱ्याच्या मर्जीवर मला सतुष्ट राहाव लागत "

रमा म्हणाली, " एव्हढं वैराग्य का हे ? "

ही थट्टा होती की चिमटा होता याची अटकळ रमेशला येईना. त्याने थोडक्यात उत्तर दिले, " नाहीं, हा नुसता आळस "

"पण दुसऱ्याची काम करताना आपण आळस केल्याच कुठं दिसलं नाही कधी."

"त्याला कारण आहे—दुसऱ्याच्या कामी आळस केला तर ईश्वरासमोर त्याचा जाब द्यावा लागेल. स्वतःच्या बाबतीतही तस असेल कदाचित् पण त्याच तेवढसं महत्त्व नाही. "

काही वेळ रमा काहींच बोलली नाही. थोड्या वेळाने म्हणाली, " आपल्या गाठीला पैसा आहे म्हणून आपण दुसऱ्याच्या कामात मन घालता. पण ज्याच्याकडे नाही त्यान काय कराव ? "

रमेश म्हणाला, "ते कस सागू रमा ? पैसा असायला जसं काही परिमाण नाहीं तसच कामात मन घालायलाही काही मर्यादा नाहीं ज्याच्या हातीं ही सारीं सूत्रे आहेत तोच पैसा असणं किंवा नसणं याचा हिशेब पाहून घेईल. "

रमा पुनः क्षणभर थाबून म्हणाली, " अजून देवाचं नाव घ्यायच आपल काहीं वय झाल नाहीं. माझ्या पेक्षा तीनच वर्षांनी मोठे आहात आपण. "

रमेश हसून म्हणाला, " अर्थात् तुझ वय तर मुळींच होऊन गेल नाहीं. ईश्वर करो अन् तू दीर्घजीवी हो. माझ हे असं आहे—आज मरण आलं तरी मला त्याच काही वाटाचं नाही. "

बोलण्यात त्यानें जो हा प्रच्छन्न आघात केला तो फुकट गेला नाहीं. रमेनें एकदम मधेच विचारले, "आपल्याला संध्या आन्हिक करताना काहीं कधी पाहिलं

नाहीं. देवळात गेलात कीं न गेलात तरी त्याच काही म्हणा--पण जेवायला बसताना आचमन करायला सुद्धा कसे विसरलात ? ”

रमेश आपल्याशीच हसून म्हणाला, “ तसा विसरलो नाहीं—पण विसरलों तरी त्याच मला काहीं वाटत नाहीं ! पण हा प्रश्न का ? ”

रमा म्हणाली, “ देवाधर्माची आपली भावना कितीशी आहे ते मला कळाव म्हणून विचारल. ”

रमेशने उत्तर दिले नाहीं. दोघेही काही न बोलता काहीं वेळ स्वस्थ राहिली होती.

रमा हळूच म्हणाली, “अस पहा, दीर्घजीवी हो म्हणून मला आशिर्वाद देण म्हणजे शाप देण. विधवा फार दिवस जगावी अस आम्हा हिदूच्या घरात कुणालाच वाटत नाहीं —” पुन. ती काही वेळ थांबली आणि म्हणाली, ‘ आज मरायला मी एका पायावर तयार आहे अस नाही खर, पण फार दिवस जगायची कल्पना मनात आली तर मला तिच भय वाटतं. आपल्याला काही नम वाटायला नको. आपणाला मी चार शब्द सागायचा प्रयत्न करण म्हणजे लहान तोडीं मोठा घास घेण्यासारख आहे. या संसारात गुतलेल्या माणसान दुस-ऱ्यासाठी डोकेफोड करून घेण म्हणजे वेडेपणा आहे अस ज्यावेळी आपल्याला वाटेल, त्यावेळीं माझ्या या भाषणाची आठवण करा म्हणजे झाल ’’

उत्तरादाखल रमेशने नुसता एक सुस्कारा सोडला. थोडा वेळ स्वस्थ राहून तो रमेप्रमाणेच हळूच म्हणाला, “ तुझी आठवण आहे म्हणूनच बोलतों--आज तरी या गोष्टीचं मला काही वाटत नाहीं. मी तुझा कुणीच नव्हे रमा—उलट तुझ्या मार्गातला मी काटा आहे, पण शेजारधर्माला स्मरून तुझ्या हातून माझी जी ही सेवा घडली ती पाहिल्यावर अस वाटत, कीं ससारात पडून आपल्या माणसाच्या हातची रोज सेवा घ्यायच ज्याच्या भाग्यी असत, मला तर अस वाटत, तीं माणस दुसऱ्याचे दुःख कष्ट पाहून पागल होऊन जातील. आताच हा मी आपल्याशींच विचार करीत होतों. एका क्षणात तू माझ्या आयुष्याची सारी दिशा बदलून टाकलीस. आजपर्यंत अस समोर बसून कुणीही मला जेवायला घातलं नव्हत. आग्रह करून कुणी कधीं खायला लावलं नव्हत. जेवणातदेखील आनंद आहे हें आज मला प्रथमच तुझ्याकडून कळल रमा ! ’’

रमेच्या सर्वांगावर थरारून रोमाच उभे राहिले. पण मनाला आळा घालून

ती म्हणाली, “ फार दिवस लागायचे नाहींत हें विसरायला. कधीं आठवण झालीच तर आपली उगीच कांहींतरी म्हणून ! ”

रमेशनें काहीं उत्तर दिलें नाहीं. रमा म्हणाली, “ गावीं गेल्यावर माझी निंदा केली नाहींत म्हणजे माझं भाग्य म्हणायचं ! ”

पुनः एक मोठा सुस्कारा सोडून रमेश म्हणाला, “ नाही रमा, निंदा करणार नाहीं कीं स्तुतीही करीत फिरणार नाहीं. माझ्या लेखीं आजचा दिवस निंदा-स्तुती पलीकडचा आहे. ”

रमेनें काहींच उत्तर दिलें नाही. काही वेळ ती तिथे बसून राहिली होती— पण थोड्या वेळानें तशीच उठून निघून आपल्या खोलींत गेली.

खोलींत जाताच—त्या एकांतात—तिच्या दोन्ही डोळ्यातून मोठमोठीं आसवे टपटप पाझरून वाहू लागलीं

## ११

दोन दिवस सारखा पाऊस पडत होता. त्या दिवशीं तिन्हीं संध्याकाळीं जरा उघाडी पडली. गोपाळ सरकारच्या शेजारीं बसून रमेश जमीनदारीचे हिशेब पहात होता.

अकस्मात् दहा वीस शेतकरी तिथे आले आणि रडत रडत म्हणाले, “यावेळीं आम्हावर दया करा छोटेसाहेब. या प्रसंगी जर तुम्हीं आम्हाला हात दिला नाहीं तर मुलाबाळानीं हातीं धरून भीक मागत घराबाहेर पडल्यावाचून दुसरा उपाय नाहीं. ”

आश्चर्यचकित होऊन रमेश म्हणाला, “ झाल काय ? ”

शेतकरी म्हणाले, “ शंभर बिघ्याच शेत बुडून गेल. पाट काढून पाणी सोडून दिलं नाही तर सार धान्य नाहींस होईल बाबूजी. गावच्या माणसाला खायला एक दाणासुद्धा रहायचा नाहीं.

शेतकरी काय म्हणतात ते रमेशला कळेना, गोपाळ सरकारनें त्याना बाजूला घेऊन सारी हकीकत विचारून घेतली. नंतर रमेशला समजावून सागितली. शभर बिघ्याच्या शेतावर या गावच्या लोकाचा सारा चरितार्थ होता. प्रत्येक शेतकऱ्याचा या शेतांत एकाद दुसरा कुणगा होता. या शेताच्या पूर्वेला एक मोठा सरकारी बांध होता. पश्चिम बाजूला उंचवटे होते, फक्त दक्षिणेकडच्या बांधावर घोषाल आणि मुकर्जी याची मालकी होती. साचलेलें पाणी सोडून द्यायला याच बाजूला

वाट होती पण या बांधावर एक मोठी रांपण लावलेली असे. वर्षाचे दोनशे रुपये किमतीचे मासे या जागीं मिळत म्हणून वेणीबाबूनें या बाधावर कडक पहारा ठेवला होता. सकाळपासून वेणीबाबूच्या दारीं धरणें धरून शेतकऱ्यांनीं त्रागा केला पण त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं, म्हणून रडत ओरडत ते इथे आले होते.

पुढील हकिकत ऐकायची अपेक्षा न करता रमेश त्याच पावलीं तिथून निघाला. वेणीबाबूच्या घरीं तो आला त्यावेळीं संध्याकाळ झाली होती.

वेणीबाबू तक्क्याला टेकून हुक्का ओढीत बसला होता आणि त्याच्या शेजारीं हलदार महाशय बसून बोलत होता. बहुधा याच गोष्टी चालल्या असाव्या कोणतीच प्रस्तावना न करता रमेश म्हणाला, "रापणीच्या जाळ्यांचा बाध तसाच ठेवून चालायचा नाही. आता फोडून काढला पाहिजे."

हुक्याची नळी हलदारच्या हातीं देऊन वेणीबाबू म्हणाला, "कुठला बाध?"

रमेशला चीड आली. तो सतापून म्हणाला, "दुसरा कुठला जाळ्याचा बाध आहे दादा? बांध फोडला नाही तर गावाच अन्न बुडून जाईल. पण सोडायचा हुकूम द्या पाहू"

वेणीबाबू म्हणाला, "पण त्याबरोबरच दोन तीनशे रुपयाचे मासेही जातील याची खबर आहे का तुला? ती भरपाई कोण करणार? तू कीं ते शेतकरी?"

राग आवरून रमेश म्हणाला, "बिचारे गरीब शेतकरी ते कुठून देणार एव्हढी रक्कम?—आणि मी तरी का म्हणून द्यावी?"

वेणीबाबूनें उत्तर दिले, "होय ना?—मग मी तरी एव्हढं नुकसान का सोसाव?" हलदाराकडे वळून तो म्हणाला, "पाहिलंत काका, अशी जमीन-दारी चालवणार हा! अरे रमेश, कळलं तुला—हरामजादे सकाळपासून हा वेळपर्यंत माणूस मेल्यासारखे रडत होते इथ. मी सार जाणतों. तुझ्या दारात काय दरवान नाहीं? तुझ्या पायांत काय पैजार नाहीं?—जा घरीं जाऊन आपल काम पहा. पाणी आपोआप आटून जाईल." असे म्हणून वेणीबाबू आणि हलदार दोघेही आपल्या विनोदावर आपणच खूष होऊन ही ही करून हसूं लागले.

रमेशचा राग अनावर झाला होता. तरीही कसाबसा राग गिळून तो शातपणे म्हणाला, "आपल्या तीन घरांतले दोनशें रुपये वाचविण्यासाठी गरिबाघरचे अन्न नाहींसं होणार आहे. नाहीं म्हटलं तरी त्याच पाच सात हजाराच तरी नुकसान होणार आहे."

हात उलटून वेणीबाबू म्हणाला, " मग होईल! पांच हजार नुकसान होईल कीं पन्नास हजार होईल! आपला उबरठा खणला तरी दोन पैसे मिळायचे नाहीत, तिथ या साल्यासाठी दोनदोनशे रुपये उधळून का द्यायचे?"

शेवटचा प्रयत्न करण्यासाठीं रमेश म्हणाला, " मग उभ्या वर्षात त्यांनीं खावं काय?"

जशी काहीं गमतच चालली होती! इकडून तिकडे उसळत, खिदळत, डोकं हालवीत हो हो करून हंसत, मधून मधून थुकत, शेवटीं स्थिर होऊन वेणीबाबू म्हणाला, " खाणार काय? पाहशील जमीन गहाण ठेवायला बेट्यांना शेवटीं माझ्याकडेच याव लागेल. बाबारे, डोक थड ठेऊन वाग. वडिलानीं एव्हढे आटेपेटे करून जो एक अर्धा तुकडा उष्टखरकटं आपल्यासाठी ठेवलं आहे तें कसबस आवरून सावरून सभाळीत पुढल्या पिढीसाठी राखून ठेवल पाहिजे ना? आपली पोरबाळं काय खाणार?—ते आधीं पहा. कर्ज काढून खातील हे लोक. नाहीतरी बेट्याना हलकट म्हणतात ते का?"

शरमेनें, रागाने संतापानें रमेशाचे सर्वांग सळसळून उठले. तरीही आवाज ताब्यात ठेऊन तो म्हणाला, " काहीच करायचं नाहीं अस ज्याअर्थी आपण ठरवलंय, त्याअर्थी आता ही चर्चा कशाला? आता रमालाच विचारतों. तिची कबुली मिळाली तर तुम्हाला एकट्याला नाकबूल करून चालायच नाही."

वेणीबाबूचा चेहरा गभीर झाला. तो म्हणाला, " ठीक. जाऊन पहा. तिचं मत वेगळं पडायच नाहीं. ती अशीतशी बायको नव्हे बाबा. तिला झुलवण सोप नाहीं. आणि तूं तर हा असा पोरसवदा. नुसत्या डोळ्याच्या जबरेखाली तिनं तुझ्या बापाला देखील नाकदुऱ्या काढायला लावल्या असत्या कसं काका?"

हलदारकाकाचें मत ऐकून घ्यायची रमेशला सवड नव्हती. वेणीबाबूच्या या अत्यत अपमानकारक प्रश्नाचे उत्तर द्यावें असेही त्याला वाटत नव्हते.

एक शब्दसुद्धां न बोलता तो तिथून निघून चालता झाला.

अगणात तुळशीवृंदावनाजवळ संध्याकाळचा दिवा लावून नमस्कार करून रमेनें वर पाहिले. ती आश्चर्यचकित झाली. अगदी समोर रमेश उभा होता. माथ्यावरचा पदर गळ्यात आणलेला होता—नमस्कार केला तो जसा काहीं रमेशलाच झाला असे वर पहाताच तिला दिसून आलें.

मागें मावशीनें पहिल्या दिवशीं संतापाच्या भरांत रमेशला इथे येण्याचा जो

निषेध केला होता तो त्याच्या ध्यानी नव्हता म्हणून तो सरळ आत येऊन हजर झाला. रमा नित्यकृत्यात मग्न आहे असे पाहून तो काहीं न बोलता वाट पहात उभा राहिला. दोघांची ही भेट जवळ जवळ महिन्याभरान झाली होती.

रमेश म्हणाला, " तुला सार कळल असेलच. पाणी सोडून देण्याच्या बाबतीन तुझ काय मत आहे ते विचारायला आलो आहें. "

रमेचें आश्चर्य इतक्यात दुरावले होते. माथ्यावरचा पदर वर ओढून घेऊन ती म्हणाली, ' अस कसं होईल ? शिवाय दादालाहि ते कबूल नाहीं. "

" ते मला माहीत आहे. त्याच्या एकट्याच्या विरोधान काही व्हायचं नाही "

थोडा विचार करून रमा म्हणाली, " पाणी सोडून दिल पाहिजे हे मलाही पटत पण मासे अटकावून ठेवायची काय तजवीज करायची ? "

रमेश म्हणाला, "पाण्याच्या एव्हढ्या झोतात तशी व्यवस्था करण शक्य नाही. यावर्षी तरी आपण हें नुकसान सोसल पाहिजे, नाहीं तर सारा गाव उपाशीं मरेल."

रमा उगीच राहिली.

रमेश म्हणाला, " तर मग तुझी अनुमति आहे तर. "

' नाहीं. " रमा हळूच म्हणाली, " एव्हढ्या रकमेची नुकसानी, सोसण मला शक्य नाहीं. "

रमेश आश्चर्यानि थक्क झाला. अशा प्रकारच्या उत्तराची त्याने अपेक्षा केली नव्हती उलट त्याला असे वाटत होते, कीं आपण आग्रह धरला तर रमा खात्रीने विरोध करणार नाहीं.

डोळे वर करून रमेने पाहिले नाही-पण रमेशला काय वाटले असेल याची तिला कल्पना आली. ती म्हणाली, " शिवाय असं पहा, इस्टेट माझ्या भावाची आहे. मी नुसती पालक आहें "

रमेश म्हणाला, " नाहीं. तू अर्धी मालकीण आहेस. "

रमा म्हणाली, " नुसती नावाची. सारी इस्टेट शेवटी यतीनच्याच हाती जाणार हे बाबाना नक्की माहीत होत म्हणून त्यानी अर्धी नुसती माझ्या नावे करून ठेवली होती "

तरीही रमेश काकुळतीला येऊन म्हणाला, " रमा, एव्हढ्याशा रकमेची काय कथा ! आम्हा सर्व लोकात तूच सपन्न आहेस. एव्हढ नुकसान म्हणजे तुझ्या हिशेबीं नुकसान नाहीं मी अगदी काकुळतीनं सागतों रमा, एव्हढ्याशा पैशासाठीं

इतक्या लोकाच्या तोंडचा घास काढून घेऊ नकोस ! अगदीं मनापासून सांगतों, तू इतका निष्ठुरपणा करशील असं मला स्वप्नातसुद्धा वाटलं नव्हतं."

तेवढ्याच शांतपणे रमेनें उत्तर दिलें. "स्वतःच नुकसान परवडत नाहीं म्हणून जर मी निष्ठूर ठरते, तर तसच म्हणाना. बरं, आपण जर एवढे दयाळू आहात तर स्वत.च ही नुकसान भरपाई करा ना ! "

तिच्या बोलण्यातल्या शांतपणांत रमेशला खवचटपणा दिसून आला त्याला चीड आली. तो म्हणाला, "रमा, माणसाची कसोटी लागते केवळ पैशाच्या बाबतींत. इथं फसवता येत नाहीं. माणसाचं खरं स्वरूप याच बाबतींत उघड-कीला येतं. आज तुझ्या बाबतींत तसच झालं पण तू अशी असशील असं मला वाटलं नव्हतं. आजवर मी समजत आलों होतों, की तुझं मन मोठं आहे—पण आतां कळलं—तसं नाहीं तुला निष्ठूर म्हणणं देखील चुकीच आहे तू नीच आहेस ! हलकट आहेस ! "

रमेला धक्का बसला. डोळे वटारून त्याच्याकडे पहात म्हणाली, "मी कोण आहे ?"

रमेश म्हणाला, "तू अत्यंत हीन आहेस, नीच आहेस ! मी काकुळतीला आलों आहे—माझ्या मनाला लागलं आहे असं पाहून तू माझ्याकडे नुकसान भरपाईची मागणी केलीस, पण दादाला ती सुद्धा छाती झाली नाहीं. तो पुरुष माणूस-त्याच्या तोंडीं हें शोभलं असतं-तू स्त्री आहेस, तुला हें शोभत नाहीं. यापेक्षा मोठं नुकसान असतं तरी देखील मी त्याची भरपाई केली असती. पण रमा, आज तुला सांगून ठेवतों, या जगात जीं पापं आहेत त्यात माणसाच्या दयेवर जुलूम करायचं पाप सर्वात मोठं आहे. आज तू तसं करू पहाते आहेस. मला गरीबाचा कळवळा आला म्हणून माझ्याकडून पैसे उकळू पहाते आहेस !"

रमा विव्हळ झाली. स्तंभित होऊन नुसती त्याच्याकडे टकमक पहात राहिली. तिच्या तोंडांतून एक शब्दसुद्धां बाहेर पडेना. तेव्हढ्याच शांतपणे, तेव्हढ्याच निश्चयाच्या स्वराने रमेश म्हणाला, "माझं वर्म तुला कळलं आहे पण त्या वर्मा-वर कसाही डाग दिलास तरी त्याचा चटका मला बसणार नाहीं, हें मी तुला सांगून ठेवतों. मी काय करणार आहे तेही तुला सांगतो. मी जबरदस्तीनं बांध फोडणार आहें—ताकत असली तर येऊन मला अटक करा ! "

रमेश निघून जातो आहे असे पाहून रमेनें त्याला हाक मारली. तो जवळ येऊन उभा राहातांच रमा म्हणाली, "माझ्या घरीं येऊन माझा अपमान

केलात—पण मी एक शब्दही बोलले नाहीं. पण पुनः असं करायचा यापुढ प्रयत्न करू नका.”

रमेशनें विचारलें, “ का ? ”

रमा म्हणाली, “ तुम्हीं एव्हढा अपमान केलात तरी देखील तुमच्याबरोबर भांडण करावं अस मला वाटत नाहीं.”

तिचा चेहरा एकदम कसा पांढराफटक झाला होता. बोलत असताना तिचे ओठ कसे थरथर कापत होते ते त्या संधिप्रकाशांतसुद्धा रमेशला दिसून आले.

पण मानसशास्त्राच्या दृष्टीनें या प्रकाराकडे पहाण्याच्या मनस्थितींत तो नव्हता. त्यानें ताडकन उत्तर दिले, “ थोडासा विचार केलास तर तुलाही दिसून येईल कीं मलाही भांडण नको आहे. तुझ्या या चांगुलपणाची मी एक कवडी सुद्धां किंमत करीत नाहीं. ते कांहीं असो, कशाला हा वितंडवाद ? मी चाललो.”

मावशी देवघरात असल्यामुळे तिला ही भानगड काहीच कळली नाहीं. ती बाहेर येऊन पहाते तो मोलकरणीला बरोबर घेऊन रमा जायला निघाली होती. आश्चर्यचकित होऊन तिनें विचारले, “ रस्त्यांत हा असा चिखल, संध्याकाळची वेळ, चाललीस कुठें रमा ? ”

एकदा दादाच्या तिकडे जाऊन येते मावशी ?

मोलकरीण म्हणाली, “ रस्त्यात एव्हढासुद्धा चिखल नाहीं मावशीबाई. छोट्या बाबूंनी असा रस्ता तयार केलाय, रस्त्यात पिंजर पडली तर टिपून घ्यावी. देव त्याच भल करो. गरीबगुरीबाना सापकिरड्यांच्या हातून वाचवलय बिचाऱ्यानं ! ”

त्यावेळीं रात्रीचे अकरा वाजले होते. वेणीबाबूच्या अंगणातून बऱ्याच लोकांच्या कुजबुजण्याचा आवाज ऐकूं येत होता. आकाशातले ढग दूर होऊन त्रयोदशीचे अंधुक चांदणें ओटीवर येऊन पडले होते

भिंतीला टेकून एक भला भक्कम वयस्क मुसलमान तिथे डोळे झाकून बसला होता. त्याच्या साऱ्या तोंडावर ताजे रक्त साकळलें होते—अंगावरच्या कपड्यावर रक्ताचा सडा पडला होता—पण तो अगदीं स्वस्थपणे बसला होता.

खालच्या आवाजांत वेणीबाबू त्याला चुचकारून सांगत होता, “ माझं एक अकबर, त्याला सात वर्षे तुरुंगांत ठोठावला नाहीं तर घोषालच बीजच नाहीं म्हणून समज—” मागे पाहून तो म्हणाला, “ आतां तूंच सांग ना रमा, गप्प का राहिलीस ? ”

पण रमा दगडाच्या पुतळीसारखी स्तब्ध बसून राहिली.

डोळे उघडून सरळ बसून अकबरअल्ली म्हणाला, " शाबास ! हा–कुणी आईच दूध प्यायला असेल तर तो छोटेबाबू ! हातीं लाठी धरावी त्यानच."

वेणीबाबू चिडून म्हणाला, " म्हणूनच तर म्हणतोंय अकबर, कुणाच्या लाठीची जखम झाली ही तुला ? त्या पोरट्याची की परदेशी भय्याची ? "

अकबराच्या जिवंणीवर थोडेसे हास्य झळकलें. तो म्हणाला, " हं: ! तो बेटा हिंदुस्थानी ? त्या बेट्याला लाठीची काय ओळख आहे ? असच ना रे गोहर ? तुझ्या पहिल्याच फटक्याला चीत झाला ना तो ? "

अकबराचे दोन्ही मुलगे जवळच बसले होते. तेही फटक्यातून बचावले नव्हते. गोहर बोलला नाही. त्यानें नुसता मानेनें होकार दिला. अकबर पुढे बोलू लागला, " माझ्या हातचा फटका बसता तर बेटा जिवंत गेलाच नसता. या गोहरच्याच लाठीच्या फटक्याला ' बापरे ' करून आडवा पडला— बर का बडेबाबू ! "

रमा उठून येऊन जवळच उभी राहिली. अकबर त्याची पीरपूरची रयत— आजपर्यंत लाठीच्या जोरावर कितीतरी जणाचा विषय त्यानें हस्तगत करून दिला होता. चीड आल्यामुळे रागाच्या भरांत तिने आज संध्याकाळीं त्याला बोलावून आणून बाधावर पहारा करण्यासाठीं पाठवून दिला होता. तिला वाटले होते, एकट्या परदेशी भय्याच्या मनगटाच्या जोरावर रमेश काय करतो हें तरी पाहू ! तो स्वत: पक्का लाठीबाज होता याची रमेला स्वप्नातसुद्धा शका आली नव्हती.

रमेच्या तोंडाकडे पहात अकबर म्हणाला, " अन् त्यावेळीं छोटेबाबू त्या बेट्याच्या हातची लाठी काढून घेऊन स्वत: बाधावर उभे राहिले ताईसाहेब ! आम्हा तिघांनासुद्धा त्यांना अटकवता आलं नाही. त्या अंधारात त्याचे डोळे वाघासारखे चमकत होते. ते म्हणाले, ' अकबर, तू म्हातारा माणूस—तूं बाजूला हो. बाध फोडला नाहीं तर गांवचीं सारी माणसं उपाशीं मरतील. एव्हढ्या-साठींच बाध फोडला पाहिजे. तुझ्या स्वत:च्या गावीं तुझी शेतजमीन आहे ना ? विचार करून पहा अकबर, तुझ शेत बरबाद झालं तर तुला कस वाटेल ? ' मी सलाम करून म्हटलं, ' अल्लाची शपथ आहे छोटेबाबू, बऱ्या बोलानं वाट सोडा. तुमच्या आड उभे राहून हे जे कोण बेटे झपाझप कुदळ मारताहेत त्यांचीं मुडकी आधीं छाटून टाकतों—' "

राग अनावर झाल्यामुळे वेणीबाबू मधेंच ओरडून म्हणाला, " बेइमान बेटे ! त्याच्यापुढं नाक घासून येऊन आता इथ मला गमजा सागतां काय ? "

बापबेटे तिघेही अस्तन्या सारून पुढे सरसावले. अकबर केकाटून म्हणाला, " खबरदार बडेबाबू, बेइमान म्हणूं नका. आम्ही मुसलमानाचे बच्चे आहोंत सार सहन करूं पण हे सहन करणार नाहीं." आपल्या हाताने कपाळावरचं रक्त पुशीत रमेला उद्देशून तो म्हणाला, " मी बेइमान का ताईसाहेब? चार भिंतींच्या आंत बसून मला बेइमान म्हणतात बडेबाबू, पण स्वतःच्या डोळ्यानी पाहिलं असतंत म्हणजे छोटेबाबू ही काय चीज आहे हे कळलं असतं याना."

तोंड वेंगाडून वेणीबाबू म्हणाला, " छोटेबाबू काय! पोलिस चौकीवर एकदा जाऊन ये. अस साग, बांधावर पहारा करीत होतों तिथं छोटेबाबून आपल्यावर हल्ला केला आणि बेदम मार दिला.—"

जीभ चावून अकबर म्हणाला, " तोबा तोबा. उजेडाला काळोख म्हणायला सांगतां का बडेबाबू?"

वेणीबाबू म्हणाला, " नाहीं तर दुसर काहीं तरी सागू. आज आधी जाऊन चौकीवर ही जखम दाखवून ये. उद्या वॉरंट काढायला लावून त्याला तुरुगात ठोठावतों. रमा, तू जरा याला समजावून सांग ना. अशी संधी पुन. मिळायची नाहीं."

रमा उगीच राहिली. ती नुसती अकबराच्या तोंडाकडे पहात होती अकबर मान हलवून म्हणाला, " नाहीं ताईसाहेब, ते शक्य नाहीं."

वेणीबाबू त्याला धमकी देत म्हणाला, " शक्य नाहीं म्हणजे काय?"

आता अकबरनेंही आवाज चढवला, " काय म्हणता बडेबाबू? मला काय लाज शरम नाहीं? पाच गांवचे लोक आज मला 'सरदार' म्हणताहेत ना? ताईसाहेब तुम्ही हुकूम करा, 'आरोपी' होऊन तुरुगात जाईन पण कुठल्या काळ्या तोंडान मी 'फिर्यादी' होऊ?"

रमा अगदीं एकच वार म्हणाली, " शक्य नाही का अकबर?'

जोरजोरानें मान हलवीत अकबर म्हणाला, " नाहीं ताईसाहेब, नाहीं. काय वाटेल तें करू शकेन पण पोलिस ठाण्यावर जाऊन स्वत.ची जखम दाखवण मला शक्य नाहीं. ऊठ रे गोहर. चल घरी जाऊ. फिर्याद करायला सागताहेत मला!" असे म्हणून तो उठून जायला निघाला.

वेणीबाबूला संताप आला. बेत फुकट जातो आहे असे पाहून रागानं त्याचे डोळे आगीचा वर्षाव करीत होते. मनांतल्या मनांत तो त्याला शिवीगाळ करू लागला —रमा सुद्धा काहीं बोलत नाहीं असे पाहून त्याचा राग आणखी भडकून उठला.

त्यानें अकबराला विनवून पाहिले, चिडवलें, रागावण्याचा आव आणला, पण त्याची पर्वा न करतां अकबरअल्ली आपल्या मुलाना घेऊन जेव्हा निघून गेला तेव्हा रमेचे हृदय फाटून त्यांतून एक दीर्घ निश्वास बाहेर पडला. तिचे दोन्ही डोळे अकारण भरून आले.

आज तिचा मोठा अपमान झाला होता—पूर्णपणे पराजय झाला होता पण ती गोष्ट मनाला लागण्यापेक्षा आपल्या अतःकरणावरचा मोठा भार हलका झाल्यासारखें आपल्याला का वाटलें, हे तिला मुळींच कळेना.

ती घरीं आली. सारी रात्र तिला झोप लागली नाहीं. तारकेश्वर येथे समोर बसून रमेशला जेवायला वाढल्याचे दृश्य पुनः पुन. तिच्या नजरेसमोर येत होते. तिला वाटले, एव्हढ्या सुदर आणि सुकुमार देहाच्या देहातील ठायीं एव्हढी माया कुठून आली ? आणि त्याचबरोबर एव्हढे तेज सहजगत्या शात कसे झाले ?

जसजसा हा विचार तिच्या मनात येत होता तसतसे डोळ्यातल्या आसवानीं तिचे सर्वांग भिजून जात होते.

## १२

लहानपणीं केव्हातरी रमेशचे प्रेम रमेवर जडले होते. तो नुसता बालपणाचा लोभ होता यात शका नाहीं—पण ती बालपणाची भावना किती गभीर स्वरूपाची होती याचा पहिला अनुभव त्याला त्या दिवशीं तारकेश्वरला मिळाला.

त्या दिवशीं सध्याकाळीं त्या काळोखात रमेसबधीचे सारे लागेबाधे तोडून फेकून देऊन तो आला त्याच दिवशीं ही जुनी भावना जास्त जाणवली त्या दुर्दैवी रात्रीच्या घटनेच्या दिवसापासून रमेच्या बाबतींतली प्रत्येक भावना रमेशच्या हृदयात मरुभूमीसारखी शून्यप्राय होऊन गेली होती पण या भावनेमुळे प्रत्येक उद्योगधंदा, उठणे, बसणे, वाचणे विचार करणेसुद्धा नीरस होऊन जाईल असे रमेशला केव्हाच वाटलें नव्हते. कुटुबघात झाल्यामुळे आणि चोहोंबाजूनी सर्वांनींच टाकून दिल्यामुळे ज्यावेळी त्याचा जीव या गावात आता एक क्षणभर सुद्धा राहू नये अस म्हणत होता, त्याचवेळीं त्या एका घटनेमुळें त्याचें मन आणखी एकदां ताळ्यावर आले.

खाजणाच्या पलिकडचा पीरपूर हा गाव त्याच्याच जमीनदारीपैकीं होता. या एका दिवशीं जमाव करून तिथले लोक रमेशच्या समोर हजर झाले.

त्यांचे म्हणणे असे होते, कीं रयत तेव्हढी सारी सारखी सारी रमेशाचीच रयत. पण त्याच्या मुलाबाळाना मुसलमान म्हणून गावच्या शाळेत घेतलें जात नाहीं. हजार प्रकारें त्यांनीं प्रयत्न करून पाहिले पण कांहीं उपयोग झाला नाहीं. कोणत्याही अटीवर मास्तर लोक त्याच्या मुलाना शाळेत घ्यायला तयार होत नव्हते.

रमेशला जितके आश्चर्य वाटले तितकाच रागही आला. अशा प्रकारचा अन्यायी अत्याचार होत असेल असे त्याला वाटलें नव्हते. तो म्हणाला, “ आज तुमच्या मुलाना घेऊन या. मी स्वतः उभा राहून त्याना शाळेत घ्यायला लावतों.”

ते म्हणाले, “ आम्ही तुमची रयत खरे, पण खंड देऊन जमिनीचा भोगवटा करतों. त्यामुळे हिंदू रयतेप्रमाणे आम्ही जमीनदाराला भीत नाहीं. पण या बाबतीत भाडण करण्यात अर्थ नाहीं. नुसता तटा उपस्थित होईल पण त्यातून काही निष्पन्न होणार नाहीं. म्हणून आम्हीं असा विचार केला आहे, कीं आमच्या मुलासाठीं एकादी छोटीशी शाळा सुरू करावी. तिला छोटेबाबूंनीं मदत केली म्हणजे झालं.”

भाडणतट्यामुळे रमेश स्वतःच जेरीला आला होता, तेव्हां त्यांचे म्हणणे कबूल करून त्यानें आपली संमति दिली आणि तेव्हापासून ही नवी शाळा अस्तित्वात आणण्याच्या कामाला तो लागला. या कामाला लागल्यापासून त्याच्या मनाला विरगुळा मिळू लागला. उभ्या वर्षात त्याची जी सर्व शक्ति खर्ची पडली होती. तिची भरपाई होऊं लागली.

रमेशला असे दिसून आले, कीं कुंवापूरच्या हिंदु लोकाप्रमाणे हे लोक प्रत्येक बाबतींत वितडवाद घालीत बसत नसत. विवादाचा प्रसग आलाच तर प्रतिक्षणी एक दावा रुजू करण्यासाठीं ते सदरेवर धाव घेत नसत. पुढाऱ्यांशी विचार केला आणि काहीं ठरवलें, म्हणजे समाधान होवो कीं न होवो, जे ठरलें असेल त्याप्रमाणे वागायची त्याची तयारी असे. विशेषतः सकटाच्या काळीं परस्पराना मदत करण्यासाठीं मनःपूर्वक पुढे येण्याची त्याची वृत्ती, उच्च किवा नीच अशा कोणत्याच हिंदू गाववाल्यात असल्याचें रमेशला दिसून आलें नव्हते.

आधीं रमेशचा जातिभेदावर फारसा विश्वास नव्हता. त्यांतून या दोन्ही गांवच्या परिस्थितीची समोरासमोर तुलना केल्यामुळे त्याची अश्रद्धा शभरपट वाढली. हिंदु लोकांतील धर्म आणि सामाजिक विषमता हींच या द्वेषमत्सराचीं कारणे आहेत असे त्याला निश्चितपणे वाटू लागलें. याच्या उलट, मुसलमानांच्या धर्मात

सर्वत्रांची समानता आहे. तसलें एकीचें बंधन हिंदु लोकात नाहीं आणि येणेही शक्य नाहीं असे त्याला वाटलें.

जातिभेद नाहींसा करण्याचा उपाय ज्या अर्थी नाही, एव्हढेच काय, पण या विषयाचा उल्लेख करणे सुद्धा खेडेगावात एकप्रकारे अशक्य आहे, त्याअर्थी या लोकातले भांडणतंटे नाहींसे करून त्याच्यात सख्य आणि प्रीति संस्थापन करण्याचा प्रयत्न करणे व्यर्थ आहे असा त्याचा निश्चय झाला

अर्थात्च, स्वतःच्या गांवाच्या उन्नतीचा प्रयत्न करण्यासाठीं हीं काहीं वर्षे त्याने जो जिवाचा आटापिटा केला होता त्याचा त्याला अत्यंत पश्चात्ताप होऊ लागला. त्याच्या मनाची अगदीं निश्चीती झाली, कीं असेच एकमेकाच्या नरडीचे घोट घेत हे अखेरपर्यंत राह्यचे. अशाच रीतीनें त्याचे आयुष्य गेल्या-खेरीज गत्यंतर नाही. या लोकांचें कधींच कल्याण होणे शक्य नाहीं असे जरी त्याला वाटत होते, तरी त्याचा सबळ पुरावा मिळण्याची तो वाट पहात होता.

बरेच दिवसपर्यंत कांहींना काही कारणामुळे त्याला काकूंची भेट घेता आली नव्हती त्या दिवशींच्या मारामारीनतर त्या बाजूला जाण्याची त्याला इच्छाही होईना.

आज सकाळींच उठून तो एकाएकीं तिच्या दारीं येऊन हजर झाला. काकूची बुद्धि आणि सारासार विचार या बाबतींत त्याचा तिच्यावर किती विश्वास होता, त्याचा त्याला स्वतःलाही अंदाज नव्हता. सकाळींच स्नान सारून, अर्धवट अंधुक प्रकाशांत चष्मा लावून ती कसले तरी पुस्तक वाचीत बसली असल्याचे पाहून रमेशला आश्चर्य वाटलें. तिलाही आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाहीं.

पुस्तक बंद करून तिनें त्याला मोठ्या स्नेहाने आत बोलावून बसवून घेतले. त्याच्या चेहऱ्याकडे वात्सल्याने पहात तिने विचारलें, "एव्हढ्या सकाळींचसा रे आलास ?"

रमेश म्हणाला, "पुष्कळ दिवस तुमची भेट झाली नाहीं काकू—हल्लीं पीरपूरला मी एक शाळा काढली आहे."

विश्वेश्वरी म्हणाली, "मी ऐकलंय. पण आमच्या शाळेत शिकवायला तू हल्लीं जात नाहींस ?"

रमेश म्हणाला, "तेच सांगायला आलोय काकू. या लोकाचं कल्याण करायला जाणं म्हणजे वेडेपणा आहे. कुणाचं बरं झालेलं ज्याना पहावत नाहीं, खोट्या अभिमानानं आणि अहंकारानं जे पछाडलेले, त्यांच्यासाठीं खाटून मरण्यात कांहीं

-सुद्धा लाभ नाहीं. यामुळ नुसते उगीच शत्रू वाढताहेत मात्र. तेव्हा ज्याच्या कल्याणाचा प्रयत्न केला तर खरोखरच काहीं निष्पन्न होईल, अशाच जागीं परीश्रम करायचं मी ठरवलय."

काकू म्हणाली, "यात काहीं विशेष नाहीं रमेश. या जगात चागल करायचा भार जो उचलतो, त्याला शत्रूच जास्त निर्माण होतात या भीतीन पीछेहाट घेणारे जे कुणी आहेत त्याच्यासारखा होऊ नकोस. तस करून नाही चालायच बाबा. हा बोजा ईश्वरान तुझ्यावर टाकला आहे, तो तुला उचललाच पाहिजे. पण काय रे रमेश, तू म्हणे त्याच्या हातच पाणी पितोस ?"

रमेश हसून म्हणाला, "आता हेच पहा काकू, इतक्यात हें तुझ्यापर्यंत येऊन पोंचल. अजून त्याच्या हातच पाणी मी घेतल नाही—पण घेण्यात मला काहीं दोष वाटत नाही मी तुमचा हा जातिभेद मानीत नाही."

आश्चर्यचकित होऊन काकूने विचारलें, "मानीत नाहीं म्हणजे काय रे ? जातिभेद मानीत नाहीं म्हणतोस, तो जातिभेद काय खोटा आहे ?"

रमेश म्हणाला, "तेच विचारण्यासाठीं आज मी मुद्दाम तुमच्याकडे आलोंय काकू. जातिभेद आहे हे मी मानतो, पण तो चागला आहे अस मानीत नाहीं"

"का ?"

रमेश एकदम उत्तेजित होऊन म्हणाला, "का ते तुम्हाला सागितल का पाहिजे ? या जातिभेदामुळ किती वादविवाद उत्पन्न झाले आहेत हे तुम्हाला माहीत का नाहीं ? समाजात ज्याना आपण हलके ठरवून ठेवल आहे ते उच्च वर्णीयाचा द्वेष करू लागलेयत, हलके करून ठेवल्याविरुद्ध बड करू लागलेयत, स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करू लागलेयत हे साहजिकच नव्हे का ? हिंदु लोकाना लोकसंग्रह नको आहे—करता येत नाहीं—त्याना जमत एकच, दुही माजवण. स्वतःच आणि स्वतःच्या जातीच सरक्षण करायचा आणि ती वाढवून पुढ आणण्याचा जो सासारिक नियम आहे तो आम्ही पाळीत नाहीं. म्हणूनच आमच्या समाजाला गळती लागली आहे. माणुसकी हिशेबात आणायचा जो एक नियम आहे, त्याच फलाफल जर तुम्हाला कळून आल काकू, तर तुम्ही घाबरून जाल. माणसाला अपमान करून खालीं पाडायचा प्रयत्न केला तर हातोहात त्याचं फल मिळतं. हिंदूची सख्या रोज घटते आहे अन् मुसलमानाची वाढते आहे हें प्रत्यक्ष दिसून येतंय तरीमुद्धां हिंदु लोक सावध होत नाहींत."

विश्वेश्वरी हसून म्हणाली. " तुझं हें एव्हढं व्याख्यान ऐकून सुद्धा मला त्याचं काहीं वाटत नाहीं रमेश. जे कुणी माणसाची मोजदाद करून पहात आहेत ते जर हिशेब सांगतील, कीं इतके इतके कमी जातींतले लोक, जात कमी म्हणून सोडून गेले, तर कदाचित् आम्ही भानावर येऊ. हिंदूची संख्या कमी होते आहे हें मला कबूल आहे पण त्याच कारण वेगळ आहे. ती देखील समाजाची चूक आहे. पण खालच्या वर्णाच्या लोकाना आम्ही हलके मानतों हें मात्र ते कारण नव्हे. नुसत्या हलकेपणासाठी कुठलाच हिंदु आपला धर्म सोडून जात नाहीं."

रमेश साशक होऊन म्हणाला, " पण काकू, जाणक लोक अनुमान करतात, कीं तच त्याचं कारण. '

काकू म्हणाली, " अनुमानाच्या विरुद्ध काहीं वाद घालता येत नाहीं बाबा !' कुणी असं जर निश्चित सागेल, कीं अमूक एका गावचे इतके इतके खालच्या जातीचे लोक याच कारणासाठीं यावर्षी धर्म सोडून गेले, तर तुझ्या या जाणक लोकाच म्हणण मी ऐकून घेईन. पण कुणीही अस निश्चितपणे सागू शकणार नाहीं याची मला खात्री आहे.'

तरीही वादाच्या अवसानाने रमेश म्हणाला, "पण हे कमी जातीचे लोक बाकीच्या उच्च वर्णीयाचा जो द्वेष करतात तो योग्यच आहे, असं निदान मला तरी वाटतं."

रमेश आवेशाला आलेला पाहून विश्वेश्वरी पुनः हसू लागली. ती म्हणाली, " अगदींच चुकतोस बाबा, अगदींच चुकतो आहेस. तुझं शहर नव्हे हें !' खेडेगावांत हा हलक्या जातीचा, तो वरिष्ठ जातीचा, अस म्हणून कुणीच डोक्याला शीण देत नाहीं. धाकटा भाऊ ज्याप्रमाणें आपण लहान म्हणून मोठ्या भावाचा द्वेष करीत नाही, चार दोन वर्ष उशीरा जन्म मिळाला म्हणून जशी त्याला कांहीं खंत वाटत नाही, तशीच या खेडेगावची स्थिती आहे. आपण ब्राह्मण नाहीं म्हणून इथ कायस्थाला एव्हढसुद्धा वाईट वाटत नाहीं कैवर्त ( शूद्र ) आणि कायस्थ समान मानले पाहिजेत म्हणून कुणी एव्हढासुद्धा प्रयत्न करणार नाहीं. मोठ्या भावाला नमस्कार करायला धाकट्या भावाला जशी मुळीच शंकाच वाटत नाहीं त्याचप्रमाणे ब्राह्मणाच्या पायावर डोकं ठेवायला कायस्थ एव्हढीही माघार घेत नाहीं. ते नव्हे बाबा. इथल्या द्वेष–मत्सराच्या मुळाशी जातिभेद नाहीं विशेषतः जिथं बंगाली लोक मेरुमणी होऊन बसले आहेत त्या त्या खेड्यात तरी खास नाहीं."

मनातल्या मनांत रमेशला आश्चर्य वाटले. तो म्हणाला, " तर मग हें असं

का होतंय काकू ? त्या गावात मुसलमानाचीं एव्हढी घर आहेत पण तिथं त्या लोकात असा वादविवाद नाहीं. एकजण दुसऱ्याला संकटात पकडून असा दाबून टाकू पहात नाहीं. पैशाच्या अभावीं द्वारिक ठाकुरचा प्रायश्चित्त विधी झाला नाहीं म्हणून त्याच्या प्रेताला खांदा द्यायला कुणीसुद्धां गेले नाही हे तर तुम्हाला माहीत आहे ? ”

विश्वेश्वरी म्हणाली, “ माहीत आहे बाबा, सार माहीत आहे. पण त्याच कारण जातिभेद नव्हे या मुसलमान लोकान अजूनही खरी धर्मबुद्धी आहे. पण आम्हा लोकात ती नाहीं. ज्याला यथार्थ धर्म म्हणतात तो आमच्या या खेड्यातून अजीबात नाहींसा झालाय. आहेत नुसत्या काहीं रूढी आणि आचारविचाराचे कुसंस्कार–आणि त्यापायीं होणारी निरर्थक भाडाभाडी ! ”

हताशपणे एक मोठा सुस्कारा सोडून रमेश म्हणाला, “ याला काही उपाय नाहीं का काकू ? ”

विश्वेश्वरी म्हणाली, “ आहे तर. उपाय आहे–पण तो कळला पाहिजे. जाणीव उत्पन्न केली पाहिजे. ज्या मार्गावर तू पाऊल टाकलयस तोच तो मार्ग. म्हणूनच तुला सागते आहे, का काय वाटेल ते झालें तरी आपली ही जन्मभूमि सोडून जाऊ नकोस. ”

रमेश काहीं तरी उत्तर देणार होता पण त्याला थाबवून विश्वेश्वरी म्हणाली, “ तू म्हणशील, मुसलमान लोकात अजाणपणा आमच्यापेक्षा जास्त आहे. पण त्याचा धर्म सजीव आहे. त्या धर्माच्या जोरावर ते चारी बाजू सभाळून राहिले आहेत. तुला एक गोष्ट सांगते रमेश, पीरपुरांत चौकशी कर—तिथ जाफर नावाचा एक सुखवस्तु माणूस आहे त्याला सर्वानीं वाळींत टाकलंय तो आपल्या विधवा सावत्र आईच पोषण करीत नाहीं म्हणून. तेच इकडे पहा आमचा हा गोविंद गांगुली—त्यानं आपल्या विधवा असलेल्या मोठ्या भावजयीला स्वतःच्या हातानीं अर्धमेली होईपर्यंत मार दिला, पण गावगंगेनं त्याला शिक्षा करायचं दूरच राहिल, तो स्वतःच गावाचा म्होरक्या होऊन बसलाय. असले हे गुन्हे आम्हा लोकात नुसते व्यक्तिगत पापपुण्यात जमा होतात. याची शिक्षा वाटलं तर ईश्वर देईल किंवा देणार नाहीं. पण गावगंगा तिकडे ढुकूनसुद्धां पाह्यची नाही. ”

हें नवीन विवेचन ऐकून एक दृष्टीनें रमेश जरी चकित झाला, तरीही हच विवेचन खर आहे असे पटायला त्याचं मन मागें पुढें होऊं लागले.

जस काहीं ते लक्षात येऊन विश्वेश्वरी म्हणाली, " परिणामाला उपाय समजायची चूक करूं नकोस बाबा. ज्या कारणामुळ तुझ्या मनातला संशय दूर होत नाही त्याच या जातीच्या उच्च नीचपणाची कल्पना घेऊन मारामारी करणं हें उन्नतीच एक ' लक्षण ' आहे—' कारण ' नव्हे रमेश. त्याचा निकाल आधीं नाहीं लागला तरी चालेल. अशी खोटी कल्पना करून, तेच घेऊन जर चळवळ करू लागलास, तर इकडे आणि तिकडे दोहींकडेही नाश होईल. माझ म्हणण बरोबर आहे की चुकीच आहे याचा प्रत्यय तुला घ्यायचा असेल तर शहरच्या आजूबाजूच्या दोनचार गावांत जाऊन फिरून ये—त्याच्या बरोबर कुवापूरची परिस्थिती ताडून पहा—आपोआपच तुला माझ म्हणणं पटेल—"

कलकत्त्याच्या अगदीं जवळ असलेल्या एक दोन गावांचा रमेशला चांगलाच परिचय होता. त्याचे ठोकळ चित्र नजरेसमोर आणण्याचा तो प्रयत्न करीत होता, तोंच जसा काही एकदम त्याच्या डोळ्यासमोरचा काळा पडदा उडून गेला आणि तो आश्चर्यचकित होऊन भांबावल्यासारखा विश्वेश्वरीच्या तोंडाकडे पहात राहिला.

त्याच्या या अवस्थेकडे मुळींच लक्ष न देता विश्वेश्वरी पूर्वानुसंधानें धिम्मेपणानें बोलत होती, "—म्हणून तुला पुनः पुनः सांगते बाबा, आपली ही जन्मभूमि टाकून कुठ जाऊ नकोस. तुझ्यासारखे बाहेर जाऊन जे मोठे झाले होते ते तुझ्यासारखेच गांवीं परत आले. पण ते जर गावचा संबंध तोडून पुनः परत गेले नसते तर खेडेगांवची अशी नासाडी झाली नसती. त्यानीं केव्हांही गोविंद गांगुली सारख्यांना माथ्यावर घेऊन तुला दूर केल नसतं"

रमेशला रमेचे बोलणे आठवले. म्हणून तो जरा रागावून म्हणाला, " दूर होण्यात मला मुळींच दुःख नाहीं काकू."

विश्वेश्वरीला त्याच्या भाषणातल्या या बदललेल्या सुराची कल्पना आली पण हेतु कळला नाहीं. ती म्हणाली, " नाही रमेश, अस म्हणून चालायचं नाहीं. आता तू आला आहेस, काम सुरू केल आहेस, मधेंच जर सोडून दिलस तर तुझी जन्मभूमि तुला क्षमा करणार नाहीं."

" असं कां म्हणता काकू, जन्मभूमि काहीं माझी एकट्याचीच नव्हे ! "

काकू गंभीर होऊन म्हणाली, " तुझी एकट्याचीच नव्हे तर कुणाची बाबा ? हो तुझीच माता आहे. एव्हढ कसं कळत नाहीं तुला, कीं कोणतीही आई आपल्या लेकराजवळ हात पसरून याचना करीत नाही. म्हणून एव्हढे लोक

होते तरी तिची तक्रार अजून कोणाच्या कानीं गेली नव्हती. तू आल्याबरोबर तुला ती हांक ऐकूं आली."

रमेशनें वादविवाद करायचे टाळले. तो काहीं वेळ तसाच स्वस्थ बसला आणि नतर अत्यत श्रद्धापूर्वक विश्वेश्वरीच्या पायावर डोकें ठेवून कांहींच न बोलता हळू हळू बाहेर निघून गेला

रमेश घरीं परत आला त्यावेळी त्याचे हृदय भक्ति, करुणा आणि कर्तव्याची प्रखर निष्ठा यानीं भरून गेले होते.

नुकताच सूर्योदय होत होता. उघड्या खिडकींतून तो निस्तब्ध आकाशाकडे, पूर्व दिशेकडे पहात होता. तितक्यात कुणा एका मुलाची हाक ऐकून तो चमकला. मान वळवून मागे पहातो तों रमेचा धाकटा भाऊ यतीन दाराच्या बाहेर उभा राहून लाजवटपणे त्याला हाक मारीत होता, "छोटेदादा!"

रमेशनें त्याला हाताला धरून आणले आणि विचारले, "कुणाला हाक मारीत होतास यतीन?"

"आपल्याला."

"मला? मला छोटेदादा म्हणायला तुला कुणी सागितलं?"

"आक्कान."

"आक्कानं? तिचा का निरोप घेऊन आलायस?"

मान हलवीत यतीन म्हणाला, "नाहीं. आक्का म्हणाली, 'माझ्याबरोबर छोटे दादाच्या घरी चल.' ती तिथे उभी राहलीय—" असे म्हणून त्यानें दरवाजाकडे पाहिले.

आश्चर्यचकित होऊन रमेशनें येऊन पाहिलें तों रमा एका खाबाच्या आड उभी होती तो समोर होऊन विनयपूर्वक म्हणाला, "आज काय हें माझे भाग्य! मला बोलावण पाठवायच स्वतः तसदी का घेतलीस? ये, अशी आत ये."

थोडासा विचार केल्यावर यतीनचा हात धरून रमा रमेशच्या मागोमाग खोलींत आली आणि चौकीजवळ येऊन बसली.

रमा म्हणाली, "मी एका वस्तुची याचना करण्यासाठीं आपल्या घरीं आलें आहे—साग़ा, द्याल का?" असे म्हणून ती रमेशच्या तोंडाकडे सारखी पहात राहिली

त्या दृष्टीक्षेपाचा रमेशच्या हृदयावर परिणाम झाला. सातही सूर जसे काहीं

एकदम झणझणत बाजूला होऊन एकदम विरघळून गेले. थोड्या वेळापूर्वी जे सारे संकल्प, आशा आणि आकांक्षा त्याच्या मनांत सळसळून उठल्या होत्या त्या एकदम नाहींशा होऊन अंधार झाला असे त्याला वाटले.

तरीही त्यानें विचारलें, " काय मागणी आहे ? "

त्याच्या प्रश्नातला अस्वाभाविक कोरडेपणा रमेच्या ध्यानीं आल्यावाचून राहिला नाहीं. तशीच त्याच्याकडे दृष्टी खिळवून ती म्हणाली, " आधीं वचन द्या. "

क्षणभर स्तब्ध राहून नतर नकारार्थी मान हलवीत रमेश म्हणाला, " तें शक्य नाही. मागणी काय आहे ते कळल्याशिवाय तुला वचन देण्याजोगी परिस्थिति आता राहिलेली नाहीं. तुझी तूच ती कोसळून घातली आहेस रमा. "

आश्चर्यचकित होऊन रमेने विचारले. " मीं ? "

रमेश म्हणाला, " तुझ्याखेरीज दुसर कोण अस करू शकेल ? रमा, आज तुला एक गोष्ट स्पष्टपणे सागतों, वाटल तर विश्वास ठेव किंवा ठेऊ नकोस, पण ती वृत्ति एकदम साफसाफ नाहींशी झाली नसती तर इतक्या उघडपणे तुला हें ऐकवण्याच मला धैर्य झालं नसतं—" एवढेंच बोलून तो क्षणभर उगीच राहिला आणि पुनः म्हणाला, " आज कोणत्याही पक्षाची एव्हढीसुद्धां नफानुकसानीची परिस्थिति राहिली नाहीं, म्हणून आज सागतों आहे. त्या दिवसापर्यंत मी कोणत्याही बाबतींत तुला नाहीं म्हटल नसतं. कां ते माहीत आहे ? "

रमा मान हलवून म्हणाली, " नाहीं. " असे म्हणताना तिच्या अंतःकरणांत शरमेची भावना आ पसरून उभी राहिली होती.

रमेश म्हणाला, " पण ऐकल्यावर रागावूं नकोस किंवा शरमूनही जाऊ नकोस. एक प्राचीन कथा ऐकतो आहें अस समज म्हणजे झालं "

रमेच्या मनात येत होते, कीं मनापासून या भाषणाला विरोध करावा. पण तिचे डोके असे झुकून पडलें, कीं सरळ मान वर उचलून पहाणे सुद्धा तिला अशक्य झाले. तितक्याच शात कोमल आणि प्राजल वृत्तीनें रमेश म्हणाला, " तुझ्यावर माझं प्रेम होत रमा. आज अस वाटतं, कुणी सुद्धां इतकं जीव तोडून कुणावर प्रेम केलं नसेल. लहानपणापासून आईच्या तोंडून ऐकत होतों, कीं आम्हा दोघाच लग्न व्हायचं म्हणून, पण ज्या दिवशीं ती आशा कोसळून पडली तो सारा दिवस मी रडून काढला होता याची आजसुद्धां मला आठवण होते आहे. "

जळत्या शिशाच्या रसासारखे ते शब्द रमेच्या कानातून प्रवेश करून तिचे

अतरग भाजून काढीत होते. अपरिचित अशा एका विशेष अनुभूतीच्या असह्य आणि तीव्र वेदनेनें तिच्या हृदयाचे शतशः तुकडे होत होते. पण निषेध करण्याचा कोणताच उपाय सुचेनासा झाल्यामुळे ती हताशपणे दगडाच्या पुतळीसारखी स्तब्ध राहिली होती आणि रमेशच्या मधुर पण जहरी अशा भाषणातील वाक्यन् वाक्य ऐकून घेत होती.

रमेश बोलत होता, “ ही सारी कहाणी तुला एकवण अयोग्य आहे अस तुला वाटेल. मलाही तसाच सशय होता. म्हणूनच त्या दिवशी नारकेश्वरला तू ज्या जिव्हाळयान मला वागवलस, आणि त्यामुळ पुढ माझ्या जीवनाच धोरण बदलल गेल, त्यावेळीं सुद्धा मी काहीं बोललो नाहीं. त्यावेळी मी बोललो नाहीं खरा पण नसं न बोलण मला किती कठीण गेलं याची तुला कल्पना व्हायची नाहीं—”

आता आणखी सहन करण रमेला अशक्य झाल. ती म्हणाली, “ तर मग–आज मी तुमच्या घरीं आले म्हणून का हा माझा अपमान करताहात ? ”

रमेश म्हणाला, “ अपमान ?–मुळींच नाही. यात मानापमानाचा काहीच सबंध नाहीं. ज्या कुणाची ही मी कहाणी सागतोय, तसली रमा तू केव्हाच नव्हतीस— आणि तसला रमेश मी आता राहिलो नाहीं. त्या दिवशी—का ते कळत नाहीं—पण माझ्या अतःकरणात निःसशय विश्वास उत्पन्न झाला होता, कीं तू कांहीं बोललीस, काहींही केलस तरी माझ अकल्याण होत असलेल तुला पहावणार नाहीं. मला वाटतं, त्यावेळीं मला अस वाटल होतं, की लहाणपणीं एकदा माझ्यावर तुझ जे प्रेम होतं ते तू काहीं अगदींच विसरली नाहीस. म्हणूनच मला वाटल होत, कीं तुला काहीं कळू न देता केवळ तुझ्या छायेखालीं राहून आयुष्यातल कार्य मी हळू हळू उरकुन घेईन. पण त्या रात्रीं जेव्हा अकबरच्या तोंडानं ऐकल, कीं तू स्वतःच—हें काय ? बाहेर ही गडबड कसली ! ”

“ बाबू—” घाबरलेला गोपाळ सरकार एकदम खोलीत येऊन रमेशला म्हणाला, “ बाबू, पोलिसानी येऊन भजवाला आताच पकडला. ”

“ कां ? ”

गोपाळची बोबडी वळली होती, तो कसाबसा उद्गारला, “ परवा रात्रीं राधानगरला जो दरोडा पडला त्यात तो होता म्हणतात. ”

रमेश इकडे तिकडे पाहून म्हणाला, “ आतां इथं एक क्षणभरही थांबूं नकोस रमा. खिडकींतून बाहेर निघून जा. पोलिस झडती घेतल्यावाचून राहणार नाहींत.”

रमेचा चेहरा काळा ठिक्कर पडला. ती उठून उभी राहून म्हणाली, " तुम्हाला तर काहीं धास्ती नाहीं ना ? "

रमेश म्हणाला, " कुणी सांगाव, एकदर प्रकरण कुठवर पोंचलं आहे याचा अजून मला तरी कुठ अंदाज आहे ? "

रमेचे ओंठ एकदम थरथर कापूं लागले. पोलिसांनीं त्या दिवशीं जो आरोप तिच्यावर केला होता त्याची तिला आठवण झाली. तिला एकदम रडूं कोसळले. रडत रडत ती म्हणाली, " मी जाणार नाहीं. "

रमाशला आश्चर्य वाटले. तो म्हणाला," छे छे ! इथं थांबण धोक्याच आहे रमा. आधीं इथून बाहेर हो. "

जबरदस्तीनें त्याने यतीनचा हात धरून त्या दोघांही बहीणभावाना खिडकीतून बाहेर काढून दिलें आणि दार बद केले.

## १३

दोन महिने होत आले–कित्येक दरोडेखोराच्या बरोबर भजवा तुरुगात पडला होता.

त्या दिवशी रमेशाच्या घराची जी झडती झाली, त्यात सशयास्पद असे काहीं मिळालें नाहीं. भजवा त्या दिवशीं आपल्याबरोबर मुलीला स्थळ शोधावयास गेला होता अशी साक्ष जरी भैरव आचार्य याने दिली तरीही त्याला जामिनावर मोकळे करण्यात आले नाहीं

वेणीबाबू येऊन म्हणाला, " रमा, चागला मागला पुढला विचार करून काम केलीं पाहिजेत, त्याशिवाय शत्रूच नाक ठेचता यायच नाहीं. धन्याच्या हुकुमावरून हातीं लाठी घेऊन भजवा त्या दिवशीं, मासे ताब्यात घेण्यासाठीं घरावर चाल करून आला, ही हकिकत जर तू ठाण्यावर लिहून दिली नसतीस तर आज त्या बेट्याला कायद्याच्या पकडीत पकडता आल नसत. अशाच जर त्यात चार दोन गोष्टी वाढवून रमेशाच नाव गुतवून दिल असतस ! त्यावेळीं कुणीच माझ्या बोलण्याकडे लक्ष दिलं नाहीं. "

रमा त्यावेळीं पाढरी फटक पडली. ते वेणीबाबूच्या लक्षात आलें आणि तो म्हणाला, " नाहीं नाहीं. तुला साक्ष द्यायला जाव लागणार नाहीं. आणि जाव लागलंच तर त्यांत काय बिघडलं ? जमीनदारी करायची म्हणजे कोणत्याही बाबतींत हटता कामा नये. "

रमा काहींच बोलली नाहीं.

वेणीबाबू सागू लागला, " पण तो काहीं असा सहज सांपडायचा नाहीं. आणि त्यानें देखील काहीं कमी उलाढाली चालवल्या नाहींत बर ही एक नवी शाळा सुरू केली आहे ना—तिच्यापायीं आम्हाला त्रास होणार आहे. आधींच हीं मुसलमान रयत आम्हाला जमीनदार म्हणून मानायला तयार नाहीं—त्यावर आता जर हे लिहायला वाचायला शिकले, तर जमीनदारी असून नसल्या-सारखी होईल हें तुला एव्हाच सागून ठेवतों. "

जमीनदारांच्या बऱ्या वाईटाच्या बाबतींत रमा अगदी वेणीबाबूच्या सल्ल्यानें चालत असे दोघाचा या बाबतींत कधींही मतभेद झाला नाहीं. आज पहिल्यानें रमेने विरोध केला ती म्हणाली, " स्वतः रमेशदादाची देखील यामुळं काही कमी नुकसानी व्हायची नाहीं ! "

वेणीबाबूला स्वतःलासुद्धा या बाबतींत बराच सदेह होता. पण चागलाच विचार करून त्याने जें ठरवले होते, तेच सागण्यासाठी तो म्हणाला, " तुला माहीत आहे रमा, स्वत.च्या नुकसानीची त्याला पर्वा नाही, आम्हा दोघाची नागी मोडली कीं तो खुष होईल अजून आला नाहीं तोच किती पैसे उडवतो आहे पाहिलस ना ? हलक्या लोकात चारी बाजूनं ' छोटेबाबू ' च केवढं मोठ नाव झालय ! जसा काही तोच एक माणूस ! आणि आम्ही या दोन घरची माणसं कुणीच नव्हे पण हें फार दिवस चालायचं नाहीं म्हणावं, आता जो हा त्याला पोलिसाच्या समोर खडा केला आहे कीं नाही—यातच त्याचा शेवटीं शेवट होईल, हे तुला सांगून ठेवतों—" बोलताना त्याला असे दिसून आलें, की आपल्या भाषणामुळे रमेला जो उत्साह आणि उत्तेजन येईल अशी त्याची अपेक्षा होती तसे काहींच झाल्याचे दिसून आलें नाही. त्याला आश्चर्य वाटले, एवढेच नव्हे, तर तिनें अगदीं गोरेमोरें तोंड करून चट्कन त्याला प्रश्न केला. " मी लिहून दिल हे रमेश दादाला कळल का ? "

वेणीबाबू म्हणाला, " ते काहीं नक्की माहींत नाहीं. पण केव्हा तरी कळणारच भजवाचा खटला सुरू झाला, कीं सार काहीं बाहेर येणार. "

रमा अधिक काहीं बोलली नाहीं. तिच्या अंतरांत तिला जो एक मोठा धक्का बसला होता तो सावरण्यासाठीं ती उगीच राहिली. रमेशला संकटात टाकायला सर्वांपेक्षा आपणच जास्त कारणीभूत झालों ही हकिकत रमेशला कळल्यावाचून राहाणार नाहीं, एवढीच गोष्ट तिच्या अतराला जाणवत होती.

काहीं वेळानें वर पाहून तिनें प्रश्न केला, " आजकाल त्याचं नांव म्हणे सर्वांच्या तोंडीं होऊन राहिलंय ना दादा ? "

वेणीबाबू म्हणाला, " नुसत्या आमच्याच गावात नव्हे—मी ऐकलय, शेजारच्या चारपाच गांवात शाळा उघडायचा त्याच्या तर्फेनं प्रयत्न चाललाय. गावागावातून एकेक दोन दोन शाळा आहेत म्हणून साहेब लोकाची उन्नति झाली आहे असं आजकाल सारे हलकें लोकसुद्धा बोलू लागलेयत. जिथ कुणी नवीन शाळा उघडील तिथ आपण दोनशे रुपये देऊ अशी रमेशान दौंडी पिटलीय. बापान कांहीं ठेऊन दिलं आहे ते तो अशा रीतीने उधळून टाकतोय मुसलमान लोक तर त्याला एक पीरपैगंबर म्हणून म्हणू लागलेयत ! "

आपले नाव जर याच नावाबरोबर जोडलें गेले असते तर ? रमेच्या अंतःकरणात हा विचार एक क्षणभर विजेसारखा झळकून गेला. पण एक क्षणभरच. दुसऱ्या क्षणाला तिचे सारे अंतरंग दुप्पट अंधाराने व्यापून गेले.

वेणीबाबू बोलत होता, " पण मी असं थोडक्यावर सोडणार नाहीं आमची सारी प्रजा अशी यान बिघडवून टाकावी आणि आम्ही जमीनदार असूनसुद्धा डोळे झांकून तोंड बंद करून ते पहात राहू, हें कुणी स्वप्नात सुद्धा आणू नये. हा बेटा भैरव आचार्य भजवाच्या बाजून साक्ष द्यायला गेला—कम त्याच्या मुलीच लग्न होत ते तर पहातों. आणखी एक डाव आहे—गोविंदकाका काय म्हणतो तें पाहू. शिवाय इकडे दरोडे तर पडतातच आहेत. एकदा नोकराला तुरुंगांत डाबला कीं धन्यालाही डाबायला फार अवकाश लागायचा नाहीं. तू ते पहिल्याच दिवशीं बोलली होतीस ना रमा, कीं वैर करायला हेही मावार घेणार नाहींत, ते अशा रीतीन खर होईल याची मलाही कल्पना नव्हती."

रमा काहींच बोलली नाहीं. स्वतःची प्रतिज्ञा आणि भविष्यवाणी अशा प्रकारे शब्दाशब्दानें खरी ठरल्याची बातमी ऐकून अभिमानानें ज्या स्त्रीचे तोंड खुलून उठत नाहीं, उलट काळे ठिक्कर पडते, त्या स्त्रीच्या मनाची अवस्था समजण्याची शक्ति वेणीबाबूत नव्हती.

ती नसली तरी परिणाम एव्हढा स्पष्ट होता, कीं तो कुणाच्याही दृष्टिआड होण्याचा संभव नव्हता. आणि तसा झाला नाहींच. वेणीबाबूला मनांतल्या मनांत आश्चर्य वाटलें सैंपाकघरात जाऊन मावशीबरोबर इकडल्या तिकडल्या चार दोन गोष्टी बोलून तो घरीं जायला निघत होता, तोंच रमेनें त्याला हातानें खुणावून

अगदीं हळूच म्हटले, “ असं पहा दादा, रमेशदादा जर तुरुंगात गेला तर डाग आम्हालासुद्धा लागायचा नाहीं का ? ”

वेणीबाबू अधिकच आश्चर्यचकित होऊन उद्गारला, “ कां ? ”

रमा म्हणाली, “ आमचाच नातेवाईक—त्याला बाचवायचा जर आम्ही प्रयत्न केला नाहीं तर सारे लोक आमचीच छीथू करतील ना ? ”

वेणीबाबूने उत्तर दिलें, “ जस कराव तसं भराव ? त्याच आम्हाला काय ?”

तशाच शातपणानें रमा म्हणाली, “ खर पाह्यचं तर रमेशदादान कांही चोरीदरोडेखोरी केलेली नाहीं, उलट दुसऱ्याच्या कल्याणासाठीं स्वतःच सर्वस्व दिलं आहे, ही गोष्ट तर जगापासून झाकून ठेवता येत नाहीं ? तस काहीं झाल तर आम्हाला गांवांत तोंड दाखवण कठीण जाईल ”

ही ही करून सारखें हसून घेऊन वेणीबाबू म्हणाला, “ तुला झालय तरी काय पोरी ? ”

मनातल्या मनात रमेने या माणसाशीं रमेशाची तुलना करून पाहिली त्यावेळी मान वर करून पाहणे तिला कठीण गेले. ती म्हणाली, “ आमच्या भीतीमुळे गावचे लोक समोर बोलणार नाहीत--पण माग बोलत राहाणारच, तुम्ही म्हणाल माग राजाच्या आईला देखील जखीण म्हणतात ! — खर आहे. पण ईश्वर तर आहे ना ? निरपराध माणसाला जर आम्ही अस सकटात घातल तर ईश्वर काही क्षमा करणार नाहीं.”

खोट्या रागाचा आव आणून वेणीबाबू म्हणाला, “ आता काय सांगू तुला माझ कपाळ ? तो पोरटा देवधर्म काहीं मानतोय ? शितळा देवीच देऊळ मोडकळीला आल आहे—त्याची दुरुस्ती करण्यासाठीं मदत मागायला लोक पाठवले होते—त्याना हाकून देऊन काय म्हणाला कळल ?—‘ ज्यान तुम्हाला पाठवलं त्याला जाऊन सागा कीं निष्कारण उधळायला माझ्याकडे पैसा नाहीं.’ आता ऐक ! त्याच्या दृष्टिनं हा निष्कारण खर्च ! आणि सकारण खर्च कुठला, तर मुसलमानाना शाळा काढून देण ! त्याशिवाय हा ब्राह्मणाचा मुलगा—सध्या आन्हिक काही करीत नाहीं ! म्हणतात, मुसलमानाच्या हातच पाणी सुद्धा पितो. जरा कुठं येसफेस करून इंग्रजी शिकल, कीं जात धर्म कुठ रहातो ?--अर्थातच नाहीं. ज्यावेळीं अधर्माच फळ मिळेल त्याला, त्यावेळी सर्वांचे डोळे उघडतील.”

जास्त वादविवाद न करतां रमा उगीच राहिली खरी पण रमेश अनाचारी

आहे, देवधर्मावर त्याची श्रद्धा नाहीं, ही गोष्ट ध्यानीं येताच तिचें मन पुनः त्याच्याविरुद्ध काहूर करू लागलें.

वेणीबाबू बोलत बोलत निघून गेला तो गेल्यावर रमा कित्येक क्षणपर्यंत तशीच ताठ होऊन राहिली होती. ज्यावेळीं ती तिथून उठून आपल्या खोलीत गेली त्यावेळीं तिने एकदम जमिनीवर अंग टाकलें.

त्या दिवशीं एकादशी होती. जेवणाचा आज उपद्याप नाहीं याबद्दल तिला तेव्हढेच समाधान वाटले.

## १४

पावसाळा संपला. अपेक्षित दुर्गापूजा उत्सवाचा आनद आणि मलेरियाची भीती बगालच्या खेडूत मातृभूमीच्या आकाशात, वातावरणात आणि प्रकाशात जिकडे तिकडे दिसू लागली. रमेशला तापानें गाठले.

गेल्या वर्षी या राक्षसाच्या पकडींतून त्याची सुटका झाली होती पण या वर्षी तो शेवटीं सापडला

तीन दिवस त्याला खडकून ताप भरला होता. आज सकाळींच उठून बरेचसे क्विनाईन खाऊन तो खिडकीच्या बाहेरून दिसणाऱ्या झगझगीत सूर्य किरणाकडे पहात बसला होता. अनवश्यक साचलेल्या पाण्याचीं गांवांत जिकडे तिकडे असलेली डबकीं आणि जगली झाडी काढून टाकण्याबद्दलची कल्पना गावच्या लोकाच्या डोक्यात घालून देणे शक्य आहे कीं नाही, याचा तो विचार करीत होता. या तीन दिवसाच्या तापामुळे त्याला स्पष्टपणे कळून चुकले होते, कीं या बाबतीत काहीना काही केलें पाहिजे. काहीं प्रयत्न न करता दरवर्षी महिन्या-मागून महिने माणसाना या रोगाच्या तडाक्यात राहू दिले तर आपल्या माणुसकीला बाध येईल, ईश्वर आपल्याला क्षमा करणार नाहीं, असे त्याला वाटले.

काहीं दिवसापूर्वी त्याने या विषयाची चर्चा केली होती. या परिस्थितीबद्दल गावच्या लोकाना मुळींच जाणीव नाही असे नाही, हे त्याला कळून चुकले होते. पण दुसऱ्याच्या जागेतलीं डबकी बुजवायचीं आणि दुसऱ्याच्या जमीनीवरचें जंगल छाटायचे काम करण्यासाठी, गाठचें खाऊन शेटची नोकरी करायला कुणी तयार नव्हते.

ज्याच्या स्वतःच्या जागेंत डबकीं आणि जंगल होते ते असे म्हणत, कीं हीं

कांहीं आपण घडवलीं नाहींत. वाडवडिलाच्या वेळेपासून तीं तशींच आहेत. अर्थात ज्या कुणाला जरुरी वाटेल त्यानें वाटले तर ही साफसफाई करावी. त्याला त्याची हरकत नाहीं. पण त्यासाठीं पैसा आणि परिश्रम खर्ची घालायची आपली तयारी नाहीं.

चौकशी करतांना रमेशला असे दिसून आले, कीं बरींच खेडीं अशी आहेत कीं जिथे एकादा गाव मलेरियानें उजाड पडला आहे, तर दुसऱ्यात त्याचा मागमूसही नाही. जरा बरे वाटताच असलीं तीं खेडीं स्वतः जाऊन आपल्या डोळ्यानी पाहून यायचे आणि त्यानंतर जे काहीं करणें तें करायचे, असा विचार तो करीत होता. त्याला निश्चितपणे असे वाटत होते, कीं मलेरिया नसलेल्या या खेड्यात पाणी वाहून जायची कांहीं तरी नैसर्गिक सोय असावी. ती सहसा लोकाच्या नजरेला येत नसावी. पण दाखवून दिली तर लोकाच्या लक्षात येईल. कुणाला जरी पटले नाहीं, तरी त्याचे एकनिष्ठ अनुयायी असलेल्या पीरपूरच्या मुसलमानाचे तरी डोळे उघडतील इंजिनिअरिंगचे जे शिक्षण इतके दिवस त्याने घेतले होते ते असे महत्वाच्या कारणीं लागण्याचा सुयोग आलेला पाहून त्याचे अंतःकरण प्रफुल्लित झाले.

" छोटेबाबू ! "

रडक्या आवाजातील ती हाक ऐकून रमेश आश्चर्यचकित होऊन मागे वळून पहातों, तों भैरव आचार्य जमिनीवर उपडा पडून बायकासारखा फुलून फुलून रडतो आहे असें त्याला दिसून आले. त्याची सात आठ वर्षांची एक मुलगीही त्याच्याबरोबर आली होती. बापाच्या रडण्याला साथ देत रडत रडत तीही घर डोक्यावर घेत होती.

पहाता पहाता घरातला जो कुणी जिथे होता तिथून तो दारी येऊन गोळा झाला आणि सर्वांनीं एकच गर्दी केली. रमेशला काहींच समजेना. या माणसाचे कुणी मेले कीं सर्वनाश झाला ?—कुणाला विचारावें आणि याचे रडणें कसे थांबवावे हे त्याला मुळींच कळेना.

हातचें काम टाकून गोपाळ सरकार धावत आला. भैरवच्या जवळ जाऊन त्याचा हात धरून त्याला उठवण्याचा प्रयत्न करूं लागताच दोन्ही हात गोपाळच्या गळ्याभोंवतीं टाकून तो मोठ्यानें भोकाड पसरून रडूं लागला. क्षुल्लक कारणानें सुद्धा हा माणूस बायकासारखा रडत सुटतो, याची रमेशला आठवण झाली. हरतऱ्हेनें गोपाळनें समजूत घालताच भैरव शेवटीं डोळे पुसून सावरून बसला आणि या रडण्याओरडण्याचें कारण सांगूं लागला. त्याचें ते विवरण

ऐकून रमेश स्तब्ध होऊन बसून राहिला. कुणाही माणसावर अशा प्रकारे भयकर अत्याचार केला जाईल याची कुणालाही कल्पना आली नसती.

वस्तुस्थिति अशी होती—भजवाच्या खटल्यात भैरवाने साक्ष दिल्यानतर तो निर्दोषी ठरल्यापासून तो पोलिसांच्या नजरेआड व्हावा म्हणून रमेशने त्याला त्याच्या गांवीं पाठवून दिले होते. आरोपी सुटला खरा पण साक्षीदार पेचांत पडला. कुठून बातमी लागली कुणाला ठाऊक, पण भैरवाच्या कानीं ती येतांच त्याने कोर्टात जाऊन चौकशी केली तेव्हा त्याला कळून चुकले, कीं वेणीबाबूचा चुलत सासरा राधानगरचा सनत् मुखर्जी याने भैरवावर दावा आणून व्याजमुद्दलसह ११२६ रु. ७ आण्याची डिक्री करून घेतली आणि त्याचे घरादर क्रोक करून त्याचे लिलाव झालें. ही डिक्री एकतर्फी झाली नव्हतीं. रीतीप्रमाणे समन्स निघाले होतें, भैरवाची सही करून तें कुणी घेतलें आणि ठरल्या दिवशीं कोर्टात हजर राहून स्वतः भैरव म्हणून कुणी कबुलीजबाब करून दिला कोण जाणे. हें ऋण खोटे होते, दावा खोटा होता, सारा व्यवहारच खोटा होता. ह्या वेछूट खोट्याच्या जोरावर बिचाऱ्या दुबळ्या माणसाचे असेल नसेल तेवढे घशाखालीं घालून त्याला रस्त्यावर भीक मागायला लावण्याचा हा प्रयत्न होता.

हा बनाव कोर्टात जाऊन उघडकीस आणणे म्हणजे सोपें काम नव्हते. ही खोटी कर्जाची रक्कम कोर्टाच्या हुकुमाप्रमाणे आधीं कोर्टात भरल्याशिवाय पुढला उपाय करणें शक्य नव्हतें. त्यानें डोकें फोडून घेतले असते तरी त्याचे कुणी ऐकून घेतले नसतें. पण दरिद्री भैरवानें ही रक्कम आणायची कुठून ? आणि ती जमा देऊन कोर्टात अपील करण्याचा प्रयत्न करायचा तरी कोणत्या आधारावर ? अर्थात् सरकारचा कायदा, कोर्ट, जज, मॅजिस्ट्रेट या सर्वांना डोक्यावर घेऊन मुकाट्यानें मरण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता.

या साऱ्या कारस्थानाच्या मुळाशीं वेणीबाबू आणि गोविंद गांगुलीच असावेत याबद्दल कुणालाच शंका वाटली नाहीं. या दरखास्तीपायीं भैरवावर मोठा अत्याचार झाला आहे, त्यामुळें भैरवाचा सर्वनाश होणार आहे हें सारे लोक बोलले असते—पण ते गुपचुप—कुणा एकाही माणसानें तोंड वर करून ठासून सांगितलें नसतें. कारण प्रत्येकजण कुणाच्या अध्यात कीं मध्यात पडायला तयार नव्हता. दुसऱ्याच्या उठाठेवी करण्याची कुणालाच सबुरी नव्हती.

तें कांहीं असो, रमेशला आज स्पष्टपणें कळून चुकले, खेड्यांतल्या दरिद्री

रयतेवर वाटेल त्या प्रकारे निःसकोच अत्याचार करण्याचें साहस या लोकांना कुठून मिळते आणि सरकारी कायदा हातीं घेऊन तो कसायाच्या सुरीसारखा कसा वापरता येतो, याचा त्याला आता पत्ता लागला.

पैशाचे बळ आणि बुद्धीचा दुरुपयोग करून जसे कायद्यातून सहज सुटून जाता येतें, त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूने, दुबळी रयत त्याच्या दुष्कृतीचे कोणत्याही रीतीनें पारिपात्य करू शकत नाही. म्हणूनच हजार अपराध करूनही गरीब खेडुतांच्या मानेवर पाय देऊन हे सत्यहीन, धर्महीन लोक बिनधोकपणें उजळ माथ्यानें व्यवहारात वावरू शकतात.

आज त्याला काकूचे शब्द पुनः पुनः आठवू लागले. त्या दिवशीं ती काळजाला भिनून जाईल अशा रीतीने म्हणाली होती, "रमेश, तुझी ती जातीपातीच्या बऱ्यावाईटाची कल्पना आणि झगडाझगडी गेली चुलींत ! अरे बाबा, आधीं लोकाना कळू दे रे बाबा, लोकाना दाखवून दे. गावोगावचे लोक आधळेपणानं अधारात चाचपडत आहेत—अरे बाबा, त्याचे डोळे उघडायचा काहीं प्रयत्न कर. काळा कुठला आणि ढवळा कुठला हें त्याना स्वतःच्या डोळ्यानीं एकदा बघता येऊ दे." तीं आणखीही म्हणालो होती, "आता आला आहेस तो परत जाऊ नकोस बाबा. तुम्ही तोड फिरवून जाता म्हणूनच तुमच्या या जन्मभूमीची अशी दुर्दशा होते !" खरच नाहीं का ? त्याला वाटलें, आपण निघून गेलों असतों तर या प्रकाराचा प्रतिकार कुणालाच करता आला नसता.

रमेशने एक सुस्कारा टाकला तो आपल्या मनाशींच म्हणाला,–हें आमच्या अभिमानाचें भाडार–हा बंगालचा शुद्ध, शात आणि न्यायनिष्ठ खेडुताचा समाज !' कुणी सागावें, पूर्वी केव्हातरी या लोकाच्या ठिकाणी कर्तबगारी होती, असेल—दुष्टाचें शासन करून आपल्या आश्रिताची ससार यात्रा पार पाडण्याची शक्तिही त्यावेळीं या लोकाच्या ठायीं असेल !

पण आज हा समाज मेला आहे ! तरीही आधळे खेडूत हा अवजड मुडदा न फेकून देता खोट्या मायेला बळी पडून रात्रदिवस माथ्यावर याचा बोजा वहात आहेत आणि त्यामुळे दिवसामागून दिवसपर्यंत थकलेले भागलेले आणि निर्जीव होऊन जात आहेत–कांहीं झाल तरी डोळे उघडून पहात नाहींत, दीनांचें रक्षण करायला जो समर्थ नाहीं—उलट त्याना विपन्न करतो–त्यालाच 'समाज' म्हणून म्हणण्याचे महापाप खेड्यातील लोकांना अधोगतीच्या मार्गाकडे खेचीत आहे.

आणखी काहीं वेळ रमेश तसाच बसून राहिला–तितक्यांत सहसा त्याला धक्का लागल्यासारखें वाटून तो उठला आणि सगळ्या रकमेचा एक चेक लिहून गोपाळ सरकारच्या हातीं देऊन म्हणाला, " आपण सगळ्या बाबींचा स्वतः तपास करून रक्कम जमा करून द्या आणि दाव्याची पुनः चौकशी होण्याबद्दलची सर्व प्रकारची तजवीज करा. यापुढ अशा प्रकारचा भयकर अत्याचार करण्याचं धैर्य त्याना होऊ देता कामा नये. "

चेक हातीं घेऊन गोपाळ सरकार आणि भैरव दोघेही काहीं वेळ वेड्या-सारखे पहात राहिले रमेशनें जेव्हा पुनः तीच गोष्ट स्पष्ट करून सागितली, तो आपली थट्टा करीत नाहीं अशी जेव्हा त्याची खात्री झाली, तेव्हा भैरव वेड्या-सारखा धावत सुटला आणि रमेशाचे दोन्ही पाय धरून रडत ओरडत आशिर्वाद देत त्याने असा काहीं दगा माजवला, की रमेशपेक्षा कमी ताकदीचा माणूस असता तर त्याच्या हातून सुटका होणें त्याला फार कठीण गेलें असते.

बातमी गावात पसरायला वेळ लागला नाहीं वेणीबाबू आणि गोविद याची आता धडगत नाहीं असेच सर्वाना वाटलें. आपल्या वैऱ्याना हातीं पकडण्यासाठीं छोटेबाबूने एव्हढे पैसे हातसाड केले असेच सर्वजण म्हणू लागले. पण दुबळया भैरवाच्या रक्षणासाठीं ईश्वराने या जबाबदारीचा भार त्याच्या माथी मारला म्हणून त्याने तो आनदाने पत्करला अशी कल्पना करणे कुणालाही वाजवी वाटलें नाहीं.

आणखी एक महिना निघून गेला. रमेशने मलेरियाविरुद्ध मोहीम सुरू केली होती यंत्रतत्र घेऊन मोठ्या उत्साहाने मोजपाप घेण्यात तो निरनिराळ्या ठिकाणी इतका गुतला होता, की दुसऱ्याच दिवशी भैरवच्या खटल्याची तारीख आहे हें तो विसरून गेला होता

आज तिन्हीसाजा लसूणचौकीवर सनईचा आवाज ऐकू आल्यामुळे त्याला आठवण पडली.

नोकराने जेव्हा सागितले की भैरव आचार्यांच्या पुतण्याचे ' उष्टावण ' आहे तेव्हा रमेश आश्चर्यचकित झाला. त्याला तर काहींच खबर नव्हती. भैरवाने एकदरींत समारभाचे मोठं अवडबर माजवल्याचे त्याला कळलें. गावच्या झाडून साऱ्या लोकाना आमत्रण दिलें होते पण रमेशला आमत्रण द्यायला कुणी घरी आले होते कीं नाही याचा कांही पत्ता लागेना.

एव्हढेच नव्हे, एव्हढा मोठा खटला भैरवाच्या माथ्यावर तळपत असतां

वीसपंचवीस दिवसांत त्यानें नुसती भेटसुद्धां घेतली नाही याचीही त्याला आठवण झाली.

ही काय भानगड ? जगातल्या साऱ्या लोकात भैरव नुसता त्यालाच वाद देईल, ही गोष्ट त्याच्या मनात येऊनही त्याला पटेना. या प्रकारामुळे त्याची त्यालाच लाज वाटली. अंगावर चादर घेऊन तो सरळ भैरव आचार्यांच्या घरीं जायला निघाला.

बाहेरूनच त्याला दिसून आलें, कीं कुपणाच्या बाजूला दोन तीन कुत्री केळीचे पान घेऊन उष्टयासाठीं झगडा करीत होतीं. जवळच लसूणचौकीवाले आगटी पेटवून तंबाखू ओढीत होते आणि वाद्यें शेकवून घेत होते.

आत प्रवेश करताच त्याला असे दिसून आलें, कीं आगणात हजार छिद्रे पडलेला शामियाना ताणला होता. गावांत असले नसलेले केरोसिनचे पाचसहा दिवे मुखर्जी आणि घोषाल याच्या घरून आणून टांगले होते. धुराने भरलेल्या त्या दिव्याच्या अंधुक प्रकाशात सारे आगण केरोसीनच्या वासानें भरून गेल्याचे दिसून येत होते.

पगती होऊन गेल्या होत्या आता फारसे कुणी शिल्लक राहिले नव्हते. आजूबाजूचे मुरब्बी लोक ' जाऊ जाऊ ' म्हणत होते आणि धर्मदास हरिहर रायला आणखी क्षणभर बसण्यासाठीं आग्रह करीत होता. एका बाजूला गोविंद गांगुली एका शेतकऱ्याच्या पोराबरोबर गुपचुप काहीं तरी बोलत होता— इतक्यांत रमेश दुःस्वप्नासारखा एकदम आंगणात येऊन हजर झाला.

त्याला पहाताच सर्वांचीं तोंडे एका क्षणात काळीं ठिक्कर पडलीं. शत्रूपक्षाचीं दोन माणसे या घरात अशा प्रकारें समारभात भाग घेत असलेलीं पाहून रमेशाचा चेहरा गोरामोरा झाला.

त्याचें स्वागत करण्यासाठीं कुणीच पुढें सरसावला नाहीं, एव्हढेच काय, पण कुणी एक शब्द सुद्धां बोललें नाहीं.

भैरव स्वतः तिथें हजर नव्हता. थोड्या वेळानें ' गोविंददादा ' म्हणून हाक मारीत तो जेव्हा बाहेर आला तेव्हा आगणाच्या मध्यभागीं जसें काहीं एकादे भूत दिसावें तशाप्रकारे घाबरून दुसऱ्याच क्षणीं एकदम पुनः घरात घुसला. बिचारा रमेश कोमेजल्या चेहऱ्यानें ज्यावेळीं घराबाहेर पडला त्यावेळीं आश्चर्यानें त्याचें अंतःकरण चूरमार होऊन गेलें होतें.

तितक्यात मागून हाक ऐकूं आली,—"बाबा रमेश—"

त्यानें वळून पाहिलें, दिनू धापा टाकीत येत होता. जवळ येऊन तो म्हणाला, " चल बाबा, घरी चल.

रमेशने नुसते हसण्याचा प्रयत्न केला एव्हढेच.

चालता चालता दिनू बोलत होता, " बाबा रे, तूं याच्यावर जे उपकार केलेस तसले त्याच्या बापदाद्यानेही केले नसतील. सर्वांना हें माहीत आहे पण त्याला काही उपाय नाहीं. कच्चींबच्चीं घेऊन आम्हा साऱ्या लोकाना संसार तर संभाळला पाहिजे ? तेव्हा तुला जर आमत्रण दिल—आता कस सागू तुला—भैरवला काहीं अगदीच दोष देता येत नाही—तुम्ही आजकालचे शहरचे तरुण लोक—जात-पात कांही मानीत नाहीं—म्हणूनच तर—काय समजलास बाबा ?—दोन दिवसांनी त्याच्या बारा वर्षांच्या धाकट्या पोरीला उजवली पाहिजे ना ? या आमच्या गावगंगेच्या राहाणी तुला माहीतच आहे बाबा—काय समजलास ?"

" हा, समजलों." रमेश उतावळपणें म्हणाला.

रमेशाच्या वाड्याच्या सदरदरवाजाजवळ उभा राहून दिनू मोठा खूष होऊन म्हणाला, " ह बाबा, तुला समजायचच. तूं तसा काहीं निर्बुद्ध नाहींस. बिचाऱ्या ब्राह्मणाला दोष कसला द्यायचा ! आम्ही म्हातारी माणसं. परलोक समोर दिसतोय त्याची काळजी लागलीय—"

" खर आहे. अगदी बरोबर आहे." असें म्हणून रमेश एकदम आंत निघून गेला. गावच्या लोकानी आपल्याला वाळीत टाकले आहे हें त्याला कळून चुकले.

तो आपल्या खोलींत येऊन बसला तेव्हां सतापानें त्याचे दोन्ही डोळे जळजळत होते वेणीबाबू आणि गोविंद या दोघाना भैरवानें आग्रहाने बोलावून आणलें हेंच त्याच्या मनाला जास्त लागले होते. आणि सारे कळून सवरून सुद्धा गावच्या लोकांनी असे करण्याबद्दल भैरवला दोष दिला नाहीं, गावकऱ्याच्या भयानें रमेशला नुसते कळवले सुद्धा नाहीं,—पण ही गोष्ट लोकाच्या दृष्टीनें प्रशंसेची ठरावी ?

" हाय भगवान् !"—तो मट्कन् खाली बसला आणि दीर्घ निश्वास सोडून म्हणाला, " या कृतघ्न जातीच्या या महापातकाचें प्रायश्चित कसं होणार ? ईश्वरा, या भयंकर अपराधाबद्दल तूं कशी क्षमा करणार ? "

## १५

अशा प्रकाराची शंका रमेशच्या डोक्यांत केव्हा आली नव्हती असे नाही. तरीही दुसरे दिवशीं संध्याकाळीं सदरेतून आल्यावर गोपाळ सरकारनें ज्यावेळी खरोखरच कळवलें, कीं भैरव आचार्याने त्याच्याच डोक्यावर फणस फोडून खाल्ला—म्हणजे खटल्याच्या वेळीं तो हजर राहिला नाहीं आणि एकतर्फी निकाल होऊन त्याने दिलेली सर्व रक्कम वेणीबाबू प्रभृतींच्या हातीं गेली त्यावेळीं एक क्षणभर रमेशच्या रागाची ज्वाला विजेच्या वेगाने पायाच्या टोकापासून ब्रह्मरध्रापर्यंत भडकून उठली.

त्या दिवशीं बनावट खटला तयार करण्याबद्दल त्याना शिक्षा व्हावी म्हणून भैरवाला ऋणमुक्त करण्यासाठीं जो पैसा त्याने दिला, तो महाकृतघ्न भैरवानें फुकट घालवून स्वतःचे डोके बचावून वर वेणीबाबूबरोबर सख्य स्थापन केले. कालच्या अपमानापेक्षा हा कृतघ्नपणा रमेशच्या अतःकरणाला अतिशयच जाणवला.

रमेश जो तिथून उठला तो सरळ बाहेर निघून गेला आत्मसयमन करण्याची त्याला शुद्ध सुद्धा राहिली नाहीं रागाने लाल झालेले धन्याचे डोळे पाहून घाबरून गोपाळनें विचारलें, “ कुठ निघालाहात का बाबू ? ”

“ हा आलोंच.” असे म्हणून रमेश एकदम तिथून गेला.

भैरवच्या घरीं माजघरात त्याने डोकावून पाहिले तों तिथे कुणीच नव्हते, म्हणून तो सरळ आत गेला. आचार्याची बायको सांजवातीचा दिवा हाती घेऊन आगणातल्या तुळशी वृंदावनाकडे जात होती. अकस्मात रमेशला समोर पाहून तिची गाळण उडाली. कधीं न येणारा माणूस आज का आला असे वाटून भीतीने तिचा प्राण कंठाशीं आला.

रमेशने तिलाच प्रश्न केला, “ आचार्य महाशय कुठ आहेत ? ”

तोंडातल्या तोंडात ती काय बोलली ते चागलेसे ऐकूं गेले नाहीं—पण तो घरी नाहीं असे ती म्हणाली असावी.

रमेशच्या अंगात त्यावेळी कोटसुद्धा नव्हता. संध्याकाळच्या अंधुक प्रकाशात त्याचा चेहराहि चागलासा दिसून येत नव्हता—इतक्यात भैरवची मोठी मुलगी लक्ष्मी कडेवर मूल घेऊन बाहेरून आंत आली आणि त्या अपरिचित माणसाला उद्देशून म्हणाली, “ आई कोण ग तो ? ”

तो कोण ते सांगायचें तिच्या आईला धैर्य झालें नाहीं—रमेशही काहीं बोलला नाही.

लक्ष्मी घाबरून गेली आणि ओरडून म्हणाली, "बाबा बाबा, कुणी एक माणूस येऊन बाहेर उभा राहिलाय आणि बोलतसुद्धां नाहीं."

"कोण रे ?" म्हणत तिचा बाप आतून बाहेर आला. रमेशला पहाताच तो तिथल्या तिथें ताठ झाला. सध्याकाळच्या अंधुक प्रकाशातही त्याची लबीचवडी मूर्ति ओळखणें त्याला कठीण गेलें नाही.

रमेश करड्या आवाजानें ओरडला, "असे खालीं या."

एकदम स्वतःच वर जाऊन त्यांने भैरवाचा बळकट हात दाबून धरला आणि म्हटलं, "कां हें अस केलस ?"

भैरव रडत ओरडला, "मारलं ग लक्ष्मी मारल ! वेणीबाबूला खबर दे."

त्यासरशीं घरातलीं झाडून सारी लहानमोठी माणसे आणि मुलेबाळे यानीं रडण्याओरडण्याचा एकच हलकल्लोळ सुरू केला आणि पहाता पहाता सध्या-काळची स्तब्धता भग करून अनेक कठांतल्या आकाश फोडून टाकणाऱ्या रडण्याओरडण्याने सारी वाडी दणाणून गेली.

त्याला एक चागलीच धडक देऊन रमेश म्हणाला, "चूप ! बोल, का हें अस काम केलंस ?

त्याला उत्तर देण्याचा मुळींच प्रयत्न न करता भैरव एकसारखा किंचाळून गळा फोडून ओरडू लागला आणि त्याच्या पकडीतून सोडवून घेण्यासाठीं हिसकाहिसकी करू लागला.

पहाता पहाता पाड्यातले सारे बायकापुरुष आंगणात गोळा झाले आणि हा तमाशा पाहण्यासाठीं कित्येक लोक गर्दी करून घरात घुसण्यासाठीं ठेलाठेली करूं लागले. संतापानें बेभान झालेल्या रमेशनें तिकडे मुळीच लक्ष दिले नाहीं.

हजारो डोळ्याच्या जिज्ञासु दृष्टीसमोर उभा राहून तो उन्मत्ताप्रमाणे भैरवाला धरून घुसळूं लागला.

रमेशाच्या ताकदीबद्दल गावात बरीचशी प्रख्याती अधिकमात्रेनें झाली होती, म्हणून त्याच्या संतापलेल्या डोळ्याकडे पहातांच पुढे सरसावून त्याच्या हातून भैरवला सोडवण्याची कुणाचीच छाती होईना.

त्या घरात प्रवेश करताच गोविंद गर्दीत कुठल्या कुठेंच गडप झाला. वेणीबाबू

डोकावून मागे सरत होता तोच भैरवने त्याला पाहिलें, तेव्हां तो 'बडेबाबू बडेबाबू' म्हणून एकदम ओरडत उठला.

पण बडेबाबू तिकडे कान न देता पाहता पाहता कुठे नाहींसे झाले.

सहसा सगळ्या गावात वर्दी लागत गेली आणि त्याच घटकेला रमा तिथें धावत आली. येताच तिने रमेशचा हात दाबून धरला आणि म्हटलें, "पुरे झालं—आता सोडा त्याला."

तारवटलेल्या डोळ्यानी तिच्याकडे पहात रमेश म्हणाला, "का म्हणून?"

दातओठ दाबून धरून अगदीं हलक्या आवाजांत रमा म्हणाली, "एवढ्या लोकासमोर तुम्हाला लाज वाटत नाहीं, पण शरमेनं मी अर्धी मेली झालेंय!"

तेव्हा कुठे रमेशच त्या गर्दीकडे लक्ष गेले आणि त्यानें भैरवाचा हात सोडून दिला

"आता घरीं जा" रमा तशाच हलक्या आवाजात म्हणाली.

काहीं न बोलतां रमेश बाहेर निघून गेला. एकदम जसा कांहीं एक जादूचा खेळच झाला.

तो निघून गेला खरा, पण रमेने त्याच्यावर टाकलेली ही छाप पाहून सारेजण एकप्रकारे कानचावाचावी करू लागले. एवढ्या मोठ्या प्रमाणात सुरवात झाली पण त्याचा शेवट व्हावा तसा झाला नाहीं हे काहीं लोकाना आवडले नाही.

सारे लोक निघून गेले. गोविंद गागुली पुढें आला आणि चेहऱ्यावर बळेच गभीरपणाचा मोठा आव आणून बोट दाखवून म्हणाला, "घरांत घुसून घरवाल्याला अर्धमेला केला, याबद्दल काय करायचं ते आधीं ठरवा." दोन्ही गुढघे उराशीं धरून धापा टाकीत बसलेला भैरव हताश मुद्रेनें वेणीबाबूच्या तोंडाकडे पहात होता. अजून रमा गेली नव्हती. वेणीबाबू काय बोलेल याचा अंदाज करून ती एकदम म्हणाली, "पण याचा अपराध काहीं थोडाथोडका नाहीं दादा. शिवाय अस घर डोक्यावर घेण्यासारख झालय तरी काय?"

"म्हणतेस तरी काय रमा?" वेणीबाबू भयकर आश्चर्य प्रकट करीत म्हणाला.

भैरवाची मोठी मुलगी खुन्टीला धरून उभी राहून अजूनही रडत होती. दुखावलेल्या नागिणीसारखी एकदम फूत्कार करून ती म्हणाली, "तूं तर त्याच्याच पडपानं बोलणार रमाआक्का. कुणी घरांत घुसून तुझ्या बापाला मार दिला असता तर तूं काय केलं असतस? साग ना?"

तिच्या त्या अवतारामुळे रमा पहिल्याने जरा चमकली. बापाला सोडवल्याबद्दल उपकार मानायचे ते बाजूला राहिले—उलट तिच्या खवचट उद्गारांतला आशय ध्यानीं येऊन रमेच्या तो मनाला एव्हढा जाणवला, कीं ती त्याच क्षणीं संतापून उसळून उठली. तरीही आत्मसंयमन करून म्हणाली, "माझा बाप आणि तुझा बाप याच्यात फार फरक आहे लक्ष्मी. ती तुलना करायच्या भानगडींत पडूं नकोस. कुणाच्या पडपानं काही मी बोलले नाहीं. बोलले ती बऱ्यासाठींच बोलले."

लक्ष्मी अस्सल खेडेगांवची मुलगी. ती काय झगडा करायला मागे घेणार? मोठ्या जोरानें सरसावून येऊन ती म्हणाली, "खर आहे, त्याची बाजू घेऊन कदाळ करायला तुला लाज वाटत नाहीं. मोठ्याची मुलगी म्हणून बोलायची छाती होत नाहीं लोकाना. पण काय आहे ते साऱ्या लोकांना माहीत झालंय. तू म्हणूनच उजळ माथ्यानं मिरवतेस. दुसरी कुणी असती तर तिन गळ्याला फास लावून घेतला असता."

लक्ष्मीला दटावीत वेणीबाबू म्हणाला, "आता उगीच रहा ना लक्ष्मी. या गोष्टी यावेळीं कशाला?"

"यावेळीं कशाला काय?" लक्ष्मी म्हणाली, "ज्याच्यामुळ बाबाना एव्हढा त्रास झाला, त्याची बाजू घेऊन झगडते आहे! आणि बाबाचा जीव गेला असता तर?"

एक क्षणभरच रमा स्तंभित झाली होती. पण वेणीबाबूच्या खोट्या रागाच्या अवसानामुळें ती आणखी उसळून उठली. ती लक्ष्मीला उद्देशून म्हणाली, "लक्ष्मी, अशा माणसाच्या हातचा मार मिळायला सुद्धा भाग्य हवं. आज मेला असता तुझा बाप तर स्वर्गाला गेला असता."

"अस्स!" लक्ष्मी सळसळून म्हणाली, "म्हणूनच त्याच्यासाठीं एव्हढी मरतेयस वाटतं रमाअक्का?"

रमेने उत्तर दिलें नाहीं. तिच्याकडून नोंड फिरवून वेणीबाबूला उद्देशून ती म्हणाली, "पण झाल काय ते तुम्हीच सांगा ना दादा?" असे म्हणून ती त्याच्या डोळ्याला डोळा देऊन पहात राहिली. काळोखाचा भेद करून ती जशी कांहीं वेणीबाबूच्या अंतरगाचा ठाव घेऊन पहात होती.

वेणीबाबू संतापून म्हणाला, "कसं सांगणार बाई? लोक हजार प्रकारे बोलतात—त्यांच ऐकून चालायच नाहीं!"

" लोक काय बोलतात ? "

" बोलेनात का ते रमा ? " वेणी खवचटपणे म्हणाला, " कुणाच्या बोलण्यान अंगाला फोड तर येत नाहींत ? बोलूं देत त्यांना. "

त्याच्या या कपटी सहानुभूतीचा रमेला अदाज आला. एक क्षणभर स्वस्थ राहून ती म्हणाली, " तुमच्या अगाला येत नसतील फोड, पण सर्वांच्याच अगाला कुठं गेंड्याच कातड असतं ? पण लोकाना या गोष्टी सागत कोण ! तुम्ही ? "

" मी ? "

आत येणारी रागाची उसळी दाबून रमा म्हणाली, " तुमच्याखेरीज दुसर कुणी नाहीं. कोणतं दुष्कर्म करायच तुम्ही ठेवलंय ! चोरी, लबाडी, बनावट खतं, घराला आग घालण—सार काहीं होऊन गेलय. मग एव्हढच कस बाकी राहील ?"

वेणीबाबू सर्द झाला. त्याच्या तोंडून शब्द निघेना.

रमा म्हणाली, " असल्या बातम्यांनी बायकाच्या जातीचा जो सत्यानाश होतो त्याला पारावार नाहीं, हें तरी तुम्हांला कळतं कीं नाही ? पण मी अस विचारते, असली बातमी पसरविण्यात तुम्हाला फायदा काय ? "

" मला कसला फायदा ? " वेणीबाबू घाबरून म्हणाला, "रमेशाच्या घरातून भल्या पहाटे तू बाहेर निघाल्याचं जर लोकाच्या नजरेला दिसून आल—तर मी काय कराव त्याला ? "

त्याचें भाषण कानी न घेता रमा बोलत होती, " एव्हढ्या लोकांच्या समोर मला जास्ती बोलायच नाहीं–पण तुमच्या मनांत काय आहे ते मला कळत नाहीं. असं मात्र समजू नका दादा. एव्हढच ध्यानांत ठेवा, कीं तुमचा मुडदा गाडल्या-शिवाय मात्र मी मरणार नाहीं. "

आचार्यांची बायको अजून पावेतों कांही न बोलता जवळच कुठेंशी उभी होती. रमेच्या जवळ येऊन तिचा हात धरून पदराआडून ती हळूच म्हणाली, " वेडी आहेस पोरी. इथं तुला कोण ओळखत नाहीं ! " स्वतःच्या मुलीला उद्देशून ती म्हणाली, " बायकांच्या जातींत येऊन बायकांनाच नांवं ठेवूं नकोस पोरी. अधर्म आहे तो. सहन व्हायचं नाहीं देवाला. आज रमेशनं तुम्हा आम्हा लोकांवर जे उपकार केले आहेत, माणसाच्या पोटीं जन्म घेतला असतास तर ते तुला कळले असते. " असे म्हणून रमेला ओढीत ती आंत गेली.

आचार्यांच्या बायकोने आपल्या नवऱ्याला उद्देशून केलेली प्रच्छन्न निंदा आणि निरपेक्ष सत्यवादिता पाहून जमलेले सारे लोक कुठीत होऊन बाजूला सरले.

या घटनेचा कार्यकारणभाव केव्हढा मोठा असो किंवा कसाही असो, आपल्या हातून अविचार झाल्याचे पाहून रमेशच्या सुसंस्कृत अंतःकरणाला ते जाणवले. दोन दिवस त्याला इतका संकोच वाटला की तो घराबाहेर सुद्धा पडला नाहीं. पण रमा स्वेच्छेनें त्याची लाज राखायला धावून आली, एव्हढ्या लोकासमक्ष तिने त्याला सावरून धरले, हा प्रसंग आठवताच शरमेने काळयाकुट्ट झालेल्या त्याच्या अंतःकरणांत कुठे तरी झांकून राहिलेल्या विजेच्या चमकेप्रमाणें क्षणोक्षणी सौंदर्याची आणि माधुर्याची झळकती रेषा चमकू लागली. त्या ग्लानीमधे म्हणूनच समाधानाचा आनद होता.

या सुखदुःखाच्या यातना हृदयाशीं कवटाळून आणखी काही दिवस तो आपल्या भयाण घरांत अज्ञातवासात राहण्याचा सकल्प करीत होता. त्याच वेळीं त्याचा सबध जोडून बाहेर आणखी एका माणसाच्या माथ्यावर अपमानाचा भयकर डोगर कोसळून पडत होता, याची त्याला एव्हढीसुद्धा कल्पना नव्हती

परतु घरात कोंडून घेण्याचा त्याला योग नव्हता आज दुपारींच पीरपूरचे मुसलमान लोक पचायतीच्या बैठकीला हजर राहाण्यासाठीं त्याला बोलवायला आले. या बैठकीची योजना काहीं दिवसापूर्वी स्वतः रमेशनेच जुळवून आणली होती. त्या योजनेला अनुसरून ते आज जमले होते आणि छोटेबाबूंची वाट पहात थाबले होते म्हणून ज्यावेळीं निरोप आला, त्यावेळी त्याला जाणे भाग पडलें. का ते सांगतों.

तपास करताना रमेशला असे कळून आले होते, की प्रत्येक गांवांतल्या शेतकऱ्यात दरिद्री लोकाची संख्या फार मोठी होती. एक नसूभर जमिनीची सुद्धां मालकी नाहीं असे कितीतरी होते. दुसऱ्याची जमीन घेऊन खडाने चालवायची आणि आगमेहनतीने खाटून पोटापुरतें अन्न मिळवायचे. दोन दिवस काम मिळाले नाही किंवा दुखण्याबहाण्यामुळे काम करतां आलें नाहीं तर सपरिवार उपास करायचा.

नपास करता त्याला असेही आढळून आलें, कीं या लोकांपैकी पुष्कळांची स्वतःची पुजी होती पण कर्जाच्या बोजामुळे ती सारी नाहींशी झाली होती. कर्ज काढणें म्हणजे महा कठीण काम होते. जमीन गहाण घेऊन सावकार कर्ज देत असत खरे पण व्याजाचा बोजा एव्हढा मोठा असे, कीं घरच्या कार्यप्रस्थानासाठीं असो

कीं दुष्काळविष्काळामुळे असो, पण एकदा कर्ज काढायचा प्रसंग आला म्हणजे त्यातून माणसाची सुटका नसे.

दरवर्षी त्याला सावकाराच्या दारीं जाऊन हात पसरणें भाग येई. या बाबतींत हिंदु आणि मुसलमानाची सारखीच दुर्दशा होती कारण सावकार लोक बहुधा हिंदु होते.

शहरात असताना पुस्तकें वाचून रमेशला या बाबतींत जे कळले होते ते गावीं येऊन स्वतःच्या डोळ्यानीं पहाताच तो पहिल्याने एकदम सर्द होऊन गेला बँकेंत त्याचा बराच पैसा पडून राहिला होता. हा बँकेतला पैसा आणि शिवाय आणखी काहीं पैसा गोळा करून या गरीब बिचाऱ्याना सावकाराच्या पकडींतून सोडवण्यासाठी त्यानें कंबर बाधली. पण एक दोन उदाहरणे पहाताच त्याला धक्का बसला. हे दरिद्री लोक जितके असहाय आणि कृपापात्र आहेत असे त्याला वाटलें होते तितके बऱ्याच बाबतींत ते नाहीत असे त्याला दिसून आलें. हे लोक दरिद्री होते खरे, पण लबाडी करायची बुद्धि त्याच्या ठायीं काही कमी नव्हती. कर्ज काढलें तरी ते न फेडायची प्रवृत्ती त्याच्या ठिकाणीं मोठ्या प्रमाणांत होती. बहुतेक लोक सरळही नव्हते आणि साधेही नव्हते. खोटें बोलण्याची त्याना दिक्कत वाटत नसे तशीच फसवण्याची कलाही त्याना अवगत होती शेजाऱ्यापाजाऱ्याच्या बायका-मुलींच्या वर्तनाची उठाठेव करण्याची त्याना फार आवड. पुरुषाचें लग्न होणे त्याच्यात कठीण जात असे, प्रत्येक घरातला घरधाला निरनिराळ्या वयाच्या विधवाचा भार वहाण्याखालीं चिरडला गेलेला, त्यामुळे नैतिक स्वास्थ्यही फारच दूषित झाले होते. या लोकातही पुढारी होते. त्याच्याकडून मिळणारी शिक्षाही कांहीं कमी नसे. पण पोलिसाबरोबर जो चोराचा संबंध तोच संबंध या पुढाऱ्याशीं जोडला गेलेला दिसून येत असे.

असें होते तरी हे एकजात सारे लोक इतके गाजलेले, दुबळे आणि निर्धन होऊन बसले होते, कीं त्याच्यावर राग धरून बसणेही योग्य झाले नसते. भाडून कुमार्गाला गेलेल्या मुलाबद्दल बापाला जें वाटतें तेच रमेशला या लोकांबद्दल वाटत होते म्हणूनच त्यानें आज संध्याकाळीं पीरपूरच्या शाळेच्या नव्या इमारतींत पंचायत बोलावली होती.

कांहीं वेळ निघून गेला. संध्याकाळचा अंधार दूर करून दशमीचे चांदणें बाहेरच्या मोकळया मैदानावर चारी बाजूंनीं भरून गेल्याचें दिसून येत होते. जावे

कीं न जावें असा विचार करीत रमेश त्या चादण्याकडे पहात राहिला होता. इतक्यांत रमा येऊन उंबरठ्यावर उभी राहिली.

तिथें फारसा प्रकाश नव्हता. कुणी तरी मोलकरीण असेल असें समजून रमेश म्हणाला, " काय पाहिजे ? "

" बाहेर निघालात वाटतं ? "

रमेश दचकला आणि म्हणाला,' हें काय रमा ? या भलत्या वेळींशीं आलीस!"

कोणत्या कारणामुळें तिला असें अवेळीं यावें लागलें तें सांगण्याचें कारण नाहीं. पण ज्या कामासाठीं ती आली होती तें तसेंच महत्त्वाचें होतें. बोलायला कशी सुरवात करावी हें सुचत नसल्यामुळें रमा तशीच उभी राहिली. रमेशलाही कांहीं बोलायला सुचेना.

कांहीं वेळ असाच गेल्यानंतर रमेनें प्रश्न केला " आपली प्रकृति कशी काय आहे ? "

" चांगली नाहीं. शिवाय रोज रात्रीं तापही येतोय. "

" तर मग कांहीं दिवस हवाबदल केला तर बरं होईल नाहीं ? "

रमेश हंसून म्हणाला, " बरं होईल खरं — पण जाणार कसा ? "

त्याच्या हसण्याचं रमेला चमत्कारिक वाटलें. ती म्हणाली, " कामं आहेत खरीं, पण प्रकृतिची काळजी घेण्यापेक्षा कामाचं महत्त्व जास्त का आहे ? "

पुनः पूर्वीसारखेंच हसून रमेशनें उत्तर दिलें, " प्रकृतीची पर्वा करायची नाहीं असं मी म्हणत नाहीं—पण अशा कांहीं गोष्टी आहेत कीं माणसाचं जीवन त्याच्यापुढं कांहींच नसतं.—पण तुला तें कळायचं नाही रमा."

मान हलवून रमा म्हणाली, " आणि मला तें कळायलाही नको. पण तुम्ही आता कुठं तरी गेलंच पाहिजे. दिवाणजींना सांगून चला, म्हणजे सारी व्यवस्था मी पहातें. "

रमेश आश्चर्यचकित होऊन म्हणाला," माझा व्यवहार तू पहाणार ?—पण—"

" पण काय ? "

" पण काय तें सांगू रमा ? तुझ्यावर मला विश्वास टाकता येईल ? "

निःसंकोचपणें रमा एकदम म्हणाली, " इतरांना नाहीं यायचा—पण आपल्याला येईल."

तिच्या उद्गारांतील विलक्षण आत्मप्रत्यय पाहून रमेश आश्चर्यानें थक्क होऊन गेला. क्षणभर उगीच राहून तो म्हणाला, " ठीक. विचार करून पाहीन."

मान हालवीत रमा म्हणाली," नाहीं. विचार करायला अवधी नाही. आजच कुठ तरी गेले पाहिजे. नाही गेलांत तर—" बोलता बोलतां तिला स्पष्टपणे दिसून आले कीं रमेश अस्वस्थ होता होता. कारण अशा प्रकारे एकाएकी पळून गेले तर कोणता प्रसग ओढवेल याचे अनुमान करणे कठीण नव्हते.

रमेशने बरोबर अदाज केला. पण स्वतःला सावरून घेऊन तो म्हणाला, " ठीक आहे. पण मी गेलो तर त्यात तुझा काय फायदा ? मला सकटात घालायला तू आजवर काहीं कमी प्रयत्न केले नाहीस—ती तू आज दुसऱ्या कुठल्या तरी सकटाबद्दल मला सावध करायला येतेयस ? आज विसरून जाण्याइतकी ती गोष्ट काही पुराणी झाली नाही. निघून गेल्यान तुझा काय फायदा होणार तो मला स्पष्टपणे साग म्हणजे मी निघून जायला सुद्धा तयार होईन." असे म्हणून उत्तराच्या अपेक्षेने त्या अधुक प्रकाशात दिसत असलेल्या रमेच्या चेहऱ्याकडे तो पहात राहिला.

पण ने उत्तर मिळाले नाही. केवढ्या मोठ्या अभिमानामुळे रमेचे हृदय फुल्न उठले तेही त्याला कळून आले नाहीं. रमेशच्या निष्ठुर बोचकपणाच्या आघातामुळे तिचा चेहरा कसा पाढरा फटक पडला तेही त्या काळोखात त्याला दिसून आले नाही.

काहीं वेळ स्तब्ध राहून रमेने स्वतःचे मन सावरून घेतलें, नतर ती म्हणाली " ठीक आहे. आतां स्पष्टच सागते. आपण गेलात तर माझा कांही फायदा नाही. पण न गेलात तर मात्र नुकसान आहे. मला साक्ष द्यावी लागेल."

" एव्हढंच ? " रमेश कोरड्या भाषेने उद्गारला, " आणि साक्ष न दिलीस तर ? "

पुनः क्षणभर रमा म्हणाली, " न दिली तर ? न दिली तर उद्या माझ्या घरीं दुर्गापूजेसाठीं कुणी येणार नाही, यतीनच्या मुजीला कुणी जेवणार नाही, माझीं व्रतं उद्यापन—त्या प्रसगाच्या कल्पनेनेंच रमा शहारून उठली.

तिचे पुढले भाषण कळलें नसते तर हरकत नव्हती. तरीही रमेश म्हणाला, " बर मग पुढ ? "

रमा काकुळतीला येऊन म्हणाली, " पुढ काय ? कांहीं नाही तुम्ही जा. मी पदर पसरतें रमेशदादा, चोहींकडून माझा सत्यानाश करू नका. तुम्ही जा—या गावातून निघून जा."

काहीं वेळ दोघेही स्तब्ध राहिली.

कुठेही असो, कोणत्याही परिस्थितींत असो, यापूर्वी रमेला पहातांच रमेशाच्या हृदयांत कालवाकालव होत असे. आपल्या परीने हजार युक्तिप्रयुक्ती केल्या तरी, स्वतःच्या मनाला हजारों प्रकारें दोष दिला तरी, ती कालवाकालव त्याला थाबवतां येत नसे. मनाच्या विरुद्ध चाललेली ही हृदयाची तळमळ जाणवून त्याला वाईट वाटे,—शरम वाटे,—राग देखील येई—पण ते हृदय काहीं त्याला काबूत आणता येत नसे. विशेषतः आज यावेळी त्याच रमेला स्वतःच्या घरांत अकस्मात एकटी आलेली पहाताच कालचा प्रसग आठवून त्याच्या हृदयाची कालवाकालव एकदम अनावर होऊन उठली होती. रमेच्या शेवटच्या शब्दानीं एव्हढ्या दिवसानंतर ते अवखळ हृदय थडावलें. भीतीने बावरलेली भेकडपणाची स्वार्थी वृत्ती रमेच्या मुद्रेवर एव्हढ्या स्पष्टपणे दिसून आली, की आधळ्या हृदयाची दृष्टि एकदम उघडली गेली.

एक मोठा सुस्कारा टाकून रमेश म्हणाला, " ठीक. होऊन जाऊ द्या. पण आज जाण शक्य नाही. कारण, मी पळून जाव अस तुला कितीही वाटत असल तरीही आजची रात्र माझ्या हिशेबीं मोठी महत्त्वाची आहे. तुझ्या मोलकरणीला बोलाव. मला आताच इथून निघाल पाहिजे."

रमा हळूच म्हणाली, " आज निघून जाण अगदी शक्यच नाहीं का ? "

" नाही. तुझी मोलकरीण कुठ गेली ?"

" कुणीच आल नाहीं माझ्याबरोबर."

रमेश आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " म्हणतेस तरी काय ? कसल्या जोरावर तूं इथं एकटी आलीस ? बरोबर कुणी माणूस सुद्धा कस आणल नाहींस ?

रमा तशीच शांतपणे म्हणाली, " कुणी असत तरी ते काय करणार होतं ? तुमच्या हातून त्या कुणी काहीं माझी सुटका केली नसती."

" सुटका न का होईना, गावात होणारी बदनामी तर वाचली असती. रात्र काही थोडी झाली नाहीं राणी ! "

' ते कित्येक दिवस विसरून गेलेल नांव सहज बोलून जाल, पण त्यानच बदनामी होईल रमेशदादा. ' असे म्हणावें असे तिच्या मनांत आलें होते पण मन सांवरून घेऊन ती नुसती म्हणाली, " त्याचा काहीं उपयोग झाला नसता रमेशदादा ! तसा काहीं फारसा काळोख नाहीं. मी सहज एकटी जाईन." असे म्हणून उत्तराची अपेक्षा न करतां ती हळूहळू बाहेर निघून गेली.

## १६

दरवर्षी रमा मोठ्या थाटानें दुर्गोत्सव करीत असे. पहिल्या पूजेच्या दिवशींच गांवच्या साऱ्या कुणब्यामाळ्याना आकंठ भोजन घालीत असे. ब्राह्मणवाडींत देवीच्या प्रसादासाठीं एव्हढी दगल होत असे, की प्रहर रात्रपर्यंत भाज्या-कुंड्याच्या अडगळींत पाय ठेवायलासुद्धा जागा मिळत नसे. नुसते हिंदूच नव्हेत, तर पीरपूरचे मुसलमान रयतसुद्धा गर्दी करायला सोडीत नसत. या वर्षी स्वतः तिची प्रकृति बरी नव्हती तरीही एकदर अवडंबरात कमतरता केली नव्हती. चंडीमंडपात प्रतिमापूजेचा साजसरजाम केलेला असून खालीं प्रशस्त पटांगणात उत्सवाची योजना केली होती.

यथाकालीं सप्तमी पूजा संपूर्ण झाली. क्रमाक्रमाने मध्यान्ह आणि अपरान्ह पूजादेखील सपत आली होती.

आकाशात सप्तमीचा अर्धचंद्र वर येऊ लागला होता पण मुखर्जींच्या घरातल्या प्रशस्त अंगणात चारदोन गृहस्थमाणसाखेरीज चिटपाखरूंसुद्धा दिसत नव्हते. घरात रांधलेल्या अन्नाच्या रचलेल्या राशी थडावून कोरड्या होऊन जात होत्या. वरण सुकून काळवंडत चालले होते—पण अजूनपर्यंत एकसुद्धा कुणबी देवीच्या प्रसादासाठीं आला नव्हता. "काय हे ? एव्हढी पचपक्वान हे हलके लोक नाश करून टाकताहेत ! काय दिमाख हा ! " असे म्हणत वेणीबाबू हातीं गुडगुडी घेऊन एकदा आत एकदा बाहेर येराझारा घालीत फिरत हिंडत होता "–दाखवून देतों बेट्याना–शेंडी कापून हाती देतों बेट्याच्या. यव करतों, त्यव करतों ! " असे म्हणत हिंडत होता. गोविंद, धर्मदास, हलदार प्रभृति मंडळीं उतरल्या चेहऱ्याने इकडून तिकडे सारखे फिरत होते. त्याना अंदाज होईना, कीं कुणा सल्ल्याच्या कारस्थानानें हे असे झाले ! हिंदुमुसलमान एक झाले ! काय हें आश्चर्य !

इकडे अन्तर्गृहांत मावशी तर एकदम बेफाम होऊन उठली होती—ती तर एक भयंकर साठमारीच चालली होती.

या सगळ्या आरडाओरडींत एकच व्यक्ति स्वस्थ बसून राहिली होती–तो स्वतः रमा, कुणाविरुद्ध ती एक शब्दसुद्धा बोलली नाहीं. कुणालाही तिनें दोष दिला नाहीं, एकादा आरोप किंवा तक्रार हा वेळपर्यंत एव्हढीसुद्धा तिच्या तोंडांतून बाहेर पडली नाहीं.

हीच का ती रमा ? ती फार आजरी होती यात शंका नाहीं. पण ती स्वतः तसे कबूल करीत नव्हती—हंसून उडवून देत होती. रोगानें रूप नाहींसे होते—ते

जाऊ दे ! पण तो रुसवा नाहीं–तो राग नाहीं–ती चीड नाहीं–दोन केविलवाणे डोळे जसें कांहीं अंतर्व्यथेनें आणि करुणेनें माखले होते. थोडेंसे बारकाईनें पाहिले तर वाटे, कीं त्या दोन्ही आलेल्या पाण्याखालीं रडण्याचा समुद्र दाबून ठेवला होता–एव्हढीशी सुटका झाली असती तर त्या समुद्रात सारे जग वाहून गेले असते.

चडीमंडपच्या आतल्या दाराने येऊन रमा मूर्तीच्या मागे येऊन उभी राहिली. तिला पहातांच सारें हितचिंतक मंडळ एकदम गोळा होऊन खड्या आवाजांत शूद्र लोकांच्या बेचाळीस पूर्वजाचा उद्धार करूं लागले. ते ऐकून रमा नुसती हंसली. देठावरचें फुल कुणी तोडून हातीं घेतले तर ते जसे हंसते तशी ती हंसली. त्या हंसण्यात राग–द्वेष, आशा–निराशा, बरें–वाईट कांहींच दिसून येत नव्हते. ते हसणे सार्थ होते कीं निरर्थक होते ते तरी कोण सांगेल?

वेणीबाबू सतापून म्हणाला, " नाहीं नाही–ही हसण्याची गोष्ट नाहीं. याच्या मुळाशीं कोण आहे हें जर मला कळेल—" दोन्ही हात एकात एक मिसळून पिळवटून तो म्हणाला, "—तर त्याला असा रडवून टाकीन."

रमेच्या अंगावर शहारे आले. वेणीबाबू बोलत होता, " बेट्या हरामजाद्याना हें कळलं नाहीं की ज्याच्या जोरावर ते एवढ्या उड्या मारताहेत, तो रमेश स्वतः चक्की पिशीत बसलाय. त्याला चुरडून टाकायला कितीसा वेळ लागेल ? "

रमा एक शब्दसुद्धा बोलली नाहीं. हातचें काम उरकून ती तशीच मुकाट्यानें निघून गेली.

दीड महिना होऊन गेला—भैरवच्या घरात बेकायदा प्रवेश करून त्याला सुरी मारल्याच्या गुन्ह्याबद्दल रमेश तुरुंगात पडला होता.

खटल्यात वादीच्या बाजूनें फारसे प्रयत्न करावे लागले नाहींत. कसे कोण जाणे, नवीन मॅजिस्ट्रेटला आदल्या दिवशींच कळून चुकलें होतें, कीं अशाप्रकारचे गुन्हे करणे आरोपीच्या बाबतींत बरेच संभवनीय आणि स्वाभाविक! एव्हढेच काय, पण दरोडेखोरांशीं देखील त्याचा कांहीं तरी लागाबांधा असावा असाही संशय प्रदर्शित केला गेला ! पोलिस ठाण्याच्या डायरींतून या बाबतींत कांहीं पुरावे मिळाले. अशा प्रकारचे गुन्हे त्यानें पूर्वी केले असल्याचा आणि आणखी बऱ्याच संशयास्पद भानगडींत त्याचें नाव गुंतले असल्याचा पुरावा डायरींत सांपडला ! तो सुटल्यानंतर भविष्यकाळीं पोलिसानीं त्याच्यावर करडी नजर ठेवावी असे निकालांत नोंदून ठेवण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं !

विशेष साक्षी पुरावे द्यावे लागले नाहीत, तरीही रमेला साक्ष देणे भाग पडले. रमेश घरात घुसून आचार्याला मारायला गेला होता, हे खरे, पण त्याने सुरी मारली कीं नाहीं ते मात्र माहीत नाहीं—त्याच्या हातीं सुरी होती कीं नव्हती हे काहीं आठवत नाही, असे तिनें आपल्या साक्षीत सागितले होते.

पण हे खरे होते काय ? जिल्ह्याच्या कोर्टात जाऊन रमेने हे खरे म्हणून शपथे-वर सागितले होते—पण ज्या कोर्टात शपथ घेतली जात नाहीं तिथे ती काय सागणार होती ? रमेशने सुरी मारली नाही, त्याच्या हाती सुरी असणे तर दूरच राहो, एक गवताची काडीसुद्धा नव्हती हें जर बरोबर कुणाला माहीत होते तर ते रमेलाच ! तिची आठवण बरोबर होती की चुकीची होती हा प्रश्न तिला त्या कोर्टात कुणी केला असता की नसता—पण या कोर्टात मात्र खरे सागायला तिला एव्हढीसुद्धा सवड नव्हती. वेणीबाबूप्रभृति हाताजवळच्या गावगंगेला खऱ्याची चाड नव्हती—अर्थात् खऱ्याचे मोल देताना खोट्या अपवादाचा काळिमा स्वतःच्या तोंडाला माखून गावाबाहेर येऊन पडणे—असे पुष्कळ बाहेर पडले होते—नशिबीं येईल हं तिला पक्के माहीत होते.

शिवाय एव्हढी मोठी शिक्षा त्याला होईल असे रमेला स्वप्नातसुद्धा वाटले नव्हते. फार तर शेदोनशें रुपये दड होईल असे तिला सागण्यात आलें होते. विशेषतः वारवार सागितले तरीही रमेश घर सोडून जायला तयार होईना, तेव्हा रमेला रागारागाने वाटले, होऊ देच याला दड—एकदा मिळू दे शिक्षा !—पण ती शिक्षा अशी होईल, मलेरियानें पाढराफटक पडलेल्या रमेशच्या चेहऱ्याकडे पाहूनही न्यायाधिशाला दया येणार नाही—एकदम तो त्याला सहा महिने सक्तमजुरीची शिक्षा देईल—असे तिला मुळीच वाटलें नव्हते.

त्या प्रसगीं रमेला रमेशच्या चेहऱ्याकडे पाहण्याची छाती होईना. रमेश त्यावेळी सारखा तिच्या चेहऱ्याकडे पहात राहिला होता आणि काही झाले तरी तिला जेरीला आणीत नव्हता असे तिला इतरांकडून नतर कळले. तसेच तुरुं-गाची शिक्षा सागितली तेव्हा, गोपाळ सरकारने जेव्हा त्याला विनंति केली तेव्हां तो मान हलवून म्हणाला होता, " नाहीं. मॅजिस्ट्रेटने मला मरेपर्यंत तुरुंगात ठेवायचा हुकूम दिला, तरी देखील अपील करून मला सुटका करून घ्यायची नाहीं. मला वाटतं, त्या सुटकेपेक्षा तुरुग बरा."

बराच तर ! जन्माचा आश्रित असलेल्या भैरव आचार्यानें खोटी फिर्याद करून

ज्याअर्थी त्याचे ऋण फेडले, साक्षीदाराच्या पिंजऱ्यात उभे राहिल्या वेळीं रमेला ज्याअर्थी त्याच्या हाती सुरी होती की नाही हे आठवले नाही, त्याअर्थी अपील करून सुटकेची अशा कशासाठी धरायची ? त्याचा हा असामान्य अभिमान प्रचंड शिळेसारखा रमेच्या हृदयावर दडपून बसला होता--कुठेही एव्हढीसुद्धा हालचाल करायला जागा नव्हती.

केव्हढे हे दडपण ! खोटी साक्ष दिली नाही असा तिचा अंतरात्मा तिला कोणत्याही प्रकारे सांगेना ती खोटे बोलली नाही खरी पण तिने उघड करून खरेही सांगितले नाहीं. खरे झाकून ठेवण्याचा गुन्हा एव्हढा मोठा होता-त्यामुळे प्रत्येक क्षणाला असा जीव जळत राहतो असं पूर्वी केव्हा जर कळून आले असतं ! राहून राहून तिला एकच वाटत होते, भैरवाच्या कृतघ्नपणामुळे रमेश बेभान झाला ही त्याची केव्हढी चूक ! आपल्यावरच्या एकाही आरोपाला त्याने विरोध केला नाही-एक शब्दसुद्धा न बोलता तो मुकाट्यानें तुरुंगात गेला. का ? आजपर्यंत तिची इच्छा अशी कुणी शिरोधार्य केली होती ? कुणी एव्हढा मान दिला होता ? आतल्या आत जळत असता आजकाल तिला एक सत्य दिसून आले—ज्या गांव-गंगेच्या भीतीने तिनें एव्हढे नीच काम केलें, ती गांवगंगा आहे कुठे ? वेणीबाबूप्रभृति कित्येक गावांतल्या झब्बूंचा स्वार्थ आणि कठोर द्वेष याच्यापलीकडे कुठे आहे या गांवगंगेचें अस्तित्व ?

गोविंदाच्या विधवा भावजयीची हकिकत कुणाला माहीत नव्हती ? वेणी-बाबूचा आणि तिचा संबंध होता हे साऱ्या गावाला माहीत होते. गावगंगेच्या आसऱ्यामुळे ती निर्वेध राहिली होती. कारण त्या गावगंगेचा प्रमुख वेणीबाबू होता. ही सामाजिक शृंखला सर्वांगावर हजार ठिकाणी अडकवून घेऊन राहाणें हेच आयुष्याचे एकमेव सार्थक ! हेच हिंदुत्व ! !

स्वतःकडे पाहिले, की या सर्व अनर्थांचे मूळ जो भैरव त्याच्यावर राग करणे रमेला कठीण जाई. त्याची मुलगी बारा वर्षांची झाली होती-आत्ताच तिचे लग्न करून दिलें नाही तर त्याला वाळीत टाकले असते—घरचीं सारीं माणसे बहिष्कृत झाली असतीं या रूढीच्या बंधनामुळेच प्रत्येक हिंदूचे हातपाय पोटांत आकसतात. एव्हढी अनुकूलता असतानाही तिला स्वतःला गावची भीति काटतां आली नाही—ती गरीब बिचारा भैरव कशी काटू शकेल ? वेणीबाबूला विरोध करणे त्याला किती कठीण गेलें असते !-किती बिकट भयंकर आपत्ति होती ती ?

म्हातारा सनातन हाजरा रस्त्यावरून जात होता. गोविंदाने त्याला पाहिले. सामदाम करून कसेबसे मोठ्या कष्टाने गोविंदाने त्याला आणून वेणीबाबूसमोर हजर केलें. वेणीबाबू गरम होऊन म्हणाला, " एव्हढा कसला रे दिमाख तुला चढलाय सनातन ? काय तुझ्या धडावर आणखी एक डोकं उगवलय रे ! "

" कुणाला कधी दोन डोकीं असतात का बडेबाबू ? " सनातन म्हणाला, " आपल्यासारख्याना नाहीत ती माझ्यासारख्या गरिबाना कुठून असणार ? "

" काय-काय-काय म्हणतोस ! " संतापून ओरडताना वेणीबाबूच्या तोंडातून शब्द निघेना. ज्यावेळीं त्याची शेंडी वेणीबाबूच्या हातीं होती तेव्हा हाच सनातन सकाळ-संध्याकाळ येऊन बड्याबाबूचे पाय चाटीत होता. आज त्याच्याच तोंडी ही भाषा !

" दोन डोकीं कुणाला नसतात—असच म्हणत होतों मी बडेबाबू ! दुसरं काहीं नाहीं. " सनातन म्हणाला

जरा लघळपणा करीत गोविंद म्हणाला, " आम्हीं नुसते तुझ्या काळजाकडे बघतों. अरे तुम्ही कोणी देवीच्या प्रसादाला सुद्धा कसे आला नाहीं ?—मी म्हणतो, का तें कुणी सांगेल तर तो तू ! "

म्हातारा थोडेसे हसून म्हणाला, " कसल आलय माझं काळीज ? आपण जसा बडवलाय मला, तसाच मी आहे. ते जाऊं दे. देवीचा प्रसाद असो कीं काहीं असो, यापुढ कुठलाही कुणबी बामणाच्या घरीं अन्न उष्टावणार नाहीं. आम्हीं एवढंच विचारीत असतों, की आई धरित्री एवढं हे पाप कस सहन करते ? " असे म्हणून एक सुस्कारा सोडून सनातन रमेकडे वळून म्हणाला, " जरा सावध रहा बर अक्कासाहेब, पीरपूरच्या मुसलमानाच माथं फिरून गेलंय. छोटेबाबू सुटून आले कीं काय प्रसंग ओढवेल ते आई दुर्गेलाच माहीत ! इतक्यातच ते दोन चार वेळ बडेबाबूच्या घराच्या आसपास टेहेळणी करून गेलेयत. समोर हे सापडले नाहींत हे भाग्य त्यांचं. " असे म्हणून त्यानें वेणीबाबूकडे नजर फेंकली. पहाता पहाता वेणीबाबूचा संतापलेला चेहरा एकदम भीतीनें पांढरा फटक पडला

सनातन सांगत होता, " देवाच्या समोर मी खोटे बोलणार नाहीं बडेबाबू, जरा सांभाळून बोलतोंय. रात्रीं अपरात्रीं बाहेर जाऊ नका. कुठ कोण दबा धरून बसला असेल तें सांगतां यायचं नाहीं. "

वेणीबाबू कांहीं बोलणार होता पण त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना. असला मुलखाचा भेकड माणूस उभ्या जगात सापडला नसता.

एव्हढ्या वेळानें रमेनें तोंड उघडलें.अगदी काकुळतवाणीने तिने विचारलें, " सनातन, छोट्याबाबूंमुळंच का तुम्हा सर्वांचा राग ? "

" खोटं बोलेन तर नरकांत जाईन आक्कासाहेब. " देवीच्या प्रतिमेकडे पहात सनातन म्हणाला, " कारण तेच. तरीपण सर्वांत जास्त चिडलेयत ते मुसलमान. छोटेबाबूंना ते हिंदूंचा पैगबर समजतात. त्याचा पुरावा पाहिलात ना ? जाफर-अलीसारखा माणूस–ओंजळींतून पाण्याचा थेंब पडू नाहीं द्यायचा—पण छोटेबाबू ज्या दिवशीं तुरुगात गेले त्या दिवशीं त्यांच्या नावान त्यान एक हजार रुपये शाळेला दिले, मशिदीत जाऊन छोट्याबाबूंच्या नावान त्या दिवशीं सारे नमाज पडले म्हणतात ! "

रमेचा कोमेजलेला चेहरा अस्पष्ट आनंदाने उजळून उठला. ती बोलत नव्हती. पण सगळत्या दृष्टीने सनातनच्या चेहऱ्याकडे पहात राहिली होती.

झटकन् सनातनचा हात दाबून धरून वेणीबाबू म्हणाला, " हे पहा सनातन, एवढ दरोगा साहेबांच्या समोर येऊन साग. तू मागशील, ते तुला देईन. दोन बिघे जमीन सोडायला सागितलीस तर सोडून देतों–पण देवीच्या समोर शपथ घे सनातन. एव्हढा माझा ब्राह्मणाचा शब्द राख. "

आश्चर्यचकित सनातन काहीं वेळ वेणीबाबूच्या चेहऱ्याकडे पहात राहिला. आणि म्हणाला, आणखी किती दिवस मी जगणार आहे बडेबाबू ? लोभाला बळी पडून जर असल काम केल तर उद्या मेल्यावर, मला खांदा द्यायच दूरच राहो पण, लाथेन मुद्धा कुणी मला लोटणार नाहीं. ते दिवस आता राहिले नाहींत बडेबाबू, ते दिवस आतां राहिले नाहीत ! छोट्या बाबूनीं सार उलथून घातलय. "

" एव्हढा ब्राह्मणाचा शब्द मानणार नाहींस ? " गोविंद म्हणाला.

" नाहीं. " सनातन मान हालवीत म्हणाला, " मी सागितलं तर तुम्हाला राग येईल गांगुलीमहाशय, पण त्या दिवशीं पीरपूरच्या नव्या शाळेत छोटेबाबू म्हणाले होते. ' गळयात चार सुतं अडकवलीं म्हणजे कांहीं कुणी बामण होत नाहीं.' मी कांहीं आजकालचा नाही महाराज ! मी सार जाणतों. आता जें हें तुमचं चाललं आहे ते काय बामणाच काम ? तुम्हालाच विचारतों आक्कासाहेब, आता तुम्हींच सांगा ना ? "

कांहींसुद्धां न बोलता रमेने मान खालीं घातली. सनातनला आवेश आला. मनात आलेला संताप ओकून टाकण्यासाठी तो म्हणाला, " विशेषतः हीं पोरबाळ

छोटेबाबूंना शिक्षा झाल्या दिवसापासून दोन गावचीं मुलं संध्याकाळी जमून जाफर अल्लीच्या घरी जातात. ते सारे अगदी स्पष्टपणे सांगत फिरतात, की खरे जमीनदार म्हणजे छोटेबाबू बाकीचे सारे चोर-डाकू! शिवाय कुणाला सुद्धां न भीता, खडं द्यायचा नाहीं असं ठरवलंय त्यानी. बामणासारखा राहिला तर बामणं नाही तर आम्ही तसे तुम्ही!"

भीतीने वेणीबाबूचा चेहरा सुकून गेला. त्यानें विचारलें, "सनातन, माझ्यावरच त्याचा एव्हढा का राग? सांगशील मला?"

"रागावू नका बडेबाबू," सनातन म्हणाला, "पण या साऱ्या अनर्थाचं मूळ तुम्हीच, हे सर्वांना आधींच कळून चुकलंय."

वेणीबाबू उगीच राहिला. सनातनसारख्या कुणब्याच्या तोंडून ही भाषा ऐकूनसुद्धां त्याला राग आला नाही कारण राग येण्याजोगी त्याची मनःस्थिति नव्हती. त्याच्या काळजात धडकी भरली होती.

"जाफरअल्लीच्या घरीं हा अड्डा जमतो तर?" गोविंद म्हणाला, "तिथं ते काय करतात ते सांग?"

सनातन त्याच्या चेहऱ्याकडे पहात थोडा वेळ विचार करून शेवटी म्हणाला, "कोण जाणे काय करतात! पण खऱ्याची गोष्ट सांगतों, या उठाठेवी करू नका तुम्ही. या साऱ्या हिंदु-मुसलमानानी भाईभाईचं नातं जोडलंय. एक मन एक प्राण. छोटेबाबू तुरुंगात गेल्यापासून त्यांच्या मनांत संतापाच्या बाराची दारू ठांसून तयार राह्यलीय, तिथं जाऊन चकमकीन ठिणगी पाडून भडका करू नका महाराज."

सनातन निघून गेला. किती वेळ तरी काहीच बोलावेसे कुणाला वाटेना.

रमा उठून जायला निघाली तेव्हा वेणीबाबू म्हणाला, "ऐकलस ना रमा?"

रमा खुदकन् हंसली—एक शब्दसुद्धा बोलली नाही तिचे हंसणे पाहून वेणीबाबूच्या अंगाला आग लागली. तो म्हणाला, "साल्या भैरवाच्यासाठीं ही एव्हढी भानगड! तूं गेली नसतीस तिथं सोडवायला त्या भैरवाला, म्हणजे हें काहीं झालं नसतं. तू तर हसणारच रमा. बायकांना काहीं घराबाहेर पडायला नको पण आम्ही काय करावं तें सांग ना? खरोखरच एके दिवशीं जर यानीं माझं टाळकं शेकलं तर? बायकांच्या भानगडींत पडलं म्हणजे शेवटीं हें असंच व्हायचं."

भयानें, संतापाच्या भडक्यानें चेहरा वेडावांकडा करून वेणीबाबू बसून राहिला.

रमा स्तंभित झाली. वेणीबाबूला ती चांगलीच ओळखीत होती. पण इतक्या निर्लज्जपणाने तो असा उलटून पडेल असे तिला मुळीच वाटले नव्हते.

काही सुद्धां न बोलता ती क्षणभर उभी राहिली, आणि नंतर निघून घरात गेली.

आरडाओरडा करून वेणीबाबूने एक दोन कंदील मागून घेतले आणि पांच सहा माणसे बरोबर घेऊन इकडेतिकडे टेहळून पहात घाबरत घाबरत तो तिथून निघाला.

## १७

विश्वेश्वरी खोलीत आली. दाबलेल्या रडण्यामुळे सद्गदित झालेल्या कंठानें तिनें विचारले, " आज कशी आहेस ग रमा ? "

तिच्या चेहऱ्याकडे पहात थोडेसे हंसून ती म्हणाली, " आज जरा बर वाटतंय काकू. "

विश्वेश्वरी येऊन तिच्या उशाशीं बसली आणि मुकाट्यानें तिच्या मस्तकावरून हात फिरवू लागली.

आज तीन महिने झाले, रमेनें अंथरूण धरलें होते. छाती कफाने भरून गेली होती. मलेरियाचे विष सर्वांगात भिनले होते. गांवांतले पुराणे वैद्यबुवा जीव तोडून चिकित्सा करीत होते—पण कोणत्या रोगाच्या प्रभावामुळे तिच्या स्नायू न् शिरा जळून खाक होत होत्या हे त्या म्हाताऱ्याला कुठें कळत होते ?

केवळ विश्वेश्वरीच्या मनात संशय उत्पन्न झाला होता. ती संशयाची छाया हळुहळू दाट होऊ लागली होती. रमेवर तिचे पोटच्या मुलीसारखे प्रेम होतें. त्यात एवढासुद्धा प्रपंच नव्हता. त्या प्रेमामुळेच रमेच्या रोगाचे कारण काय हें तिनें करड्या नजरेने न्याहाळून ताडलें होते.

बाकीचीं माणसे ज्यावेळी भलतीच आशा धरीत होतीं, भलतीच व्यवस्था करू लागलीं होतीं, त्यावेळी तिचे हृदय फाटून जात होते.

रमेच्या दोन्ही डोळ्यांच्या खळग्या खोल गेल्या होत्या पण तिची दृष्टि मात्र अत्यंत तीव्र झाली होती, हे विश्वेश्वरीला दिसून येत होतें. अगदीं दूरदूरची वस्तु स्पष्टपणे पहाण्यासाठीं माणूस एकाग्र दृष्टी करतो त्यावेळी त्याला जशी तीक्ष्णता आणतो, तशी तिची दृष्टि झाली होती.

तिनें हळूच विचारलें, " रमा ! "

" काय काकू ? "

" मी तुझ्या आईसारखीच ना रमा ?—"

रमा मध्येंच म्हणाली, " सारखीच का म्हणतेस काकू ? तूच माझी आई. "

विश्वेश्वरी अगदीं तिच्या तोंडाजवळ वाकून म्हणाली, " तर मग मला खर सांग पोरी, तुला काय होतंय ? "

" मी आजारी पडलेय काकू. "

तिच्या फिकटलेल्या चेहऱ्यावर एक क्षणभरच लाली येऊन गेल्याचें विश्वेश्वरीच्या ध्यानीं आलें. मोठ्या प्रेमानें मान हालवीत ती म्हणाली, " ते तर या दोन चामड्याच्या डोळ्यांना दिसतच आहे कीं पोरी ! या डोळ्यांना दिसणार नाहीं असं जर काहीं असेल तर ते आपल्या आईपासून लपवून ठेऊं नकोस रमा. लपवून ठेवल्यानं दुखणं बरं होत नाहीं. "

खिडकीच्या बाहेर सकाळचें ऊन अजून तापूं लागलें नव्हतें थंड वहाणाऱ्या वाऱ्यामुळें थोडासा थंडीचाच भास होत होता. खिडकीकडे पहात रमा उगीच राहिली.

काहीं वेळानें ती म्हणाली, " बडादादा कसा आहे काकू ? "

" बरा आहे. " विश्वेश्वरी म्हणाली. " डोक्याची जखम साफ बरी व्हायला अजून बराच वेळ लागेल. पण पाच सहा दिवसात हॉस्पिटलातून सुटका होईल."

रमेच्या चेहऱ्यावर दुःखाची छाया दिसल्याचें पाहून ती म्हणाली, " वाईट वाटून घेऊ नकोस पोरी. हें असच व्हायचं. त्यातच त्याचं कल्याण आहे—"

रमेच्या चेहऱ्यावर आश्चर्याची छाया दिसल्यामुळे ती म्हणाली, " आई असून मुलावर एव्हढा प्रसंग आला असताना मी अशी कशी बोलते, असंच तुला वाटतं ना ? पण तुला खर सांगते पोरी, कीं या गोष्टीमुळे मला दुःख जास्त झालं कीं आनंद जास्त झाला तेंच सांगता येत नाही. मला माहीत आहे, कीं जे अधर्माला भीत नाहींत, त्यांना लज्जेची चाड नाहीं, त्यांना प्राणाची भीति जर तितकीच जास्त वाटली नाहीं तर हे जग उध्वस्त होऊन जाईल. म्हणूनच मला वाटतं रमा कीं कलूच्या पोरानं वेणीवर जे उपकार केले ते उपकार एकादा जिव्हाळ्याचा पाठचा भाऊसुद्धा करू शकला नसता. कोळशाचा रंग धुवून जात नाहीं पोरी, त्यासाठीं तो आगींत जाळावा लागतो. "

" त्यावेळीं घरीं कुणी नव्हतं का ?" रमेनें विचारलें.

" कां नसेल ?" विश्वेश्वरी म्हणाली, " सारे होते घरीं. पण ते काही उगीच मारायला आले नव्हते. गुन्हा कबूल करून तुरुंगांत जायचं ठरवूनच मग त्यानीं हे काम केलें. त्याना जी ही चीड आली होती ती स्वतःसाठीं नव्हती पोरी. पहिल्या फटक्याला जेव्हां वेणी बेशुद्ध होऊन पडला तेव्हां ते स्वस्थ बाजूला उभे राहिले. त्यानीं दुसरा फटका मारला नाहीं. शिवाय वर त्यानीं तबीही दिली आहे, की, वेणी यापुढ जर सावध झाला नाहीं, तर आपण तुरुंगातून सुटून येऊ की न येऊ, हा फटका कांहीं शेवटचा नव्हे."

रमा हळूहळू म्हणाली, " म्हणजे अजूनही काहीं लोक या प्रकरणामागे आहेत तर ? पण काकू आमच्या गावच्या कुणब्यांत असलं धाडस यापूर्वी कधीं नव्हत. कुठून उत्पन्न झाली ही वृत्ती ?"

विश्वेश्वरी हळूच हंसत म्हणाली, " ते तुला माहीत नाहीं का पोरी ? या इकडच्या कुणबीमाळ्यांच्या एव्हढं धैर्य कुणी उत्पन्न केल ते तुला माहीत नाहीं का ? एकदा आग पेटली की ती आपोआप विझत नसते रमा. जोरान फुंकर घालून विझवायला गेल तर आजूबाजूच्या वस्तूसुद्धां पेट घेतात. तो एकदांचा परत आला, जगला वांचला, जिथ असेल तिथं सुखी झाला की झालं. वेणीवरचा हा प्रसंग आठवून मी एक सुस्कारसुद्धा सोडणार नाहीं—" असे विश्वेश्वरी म्हणत होती खरी पण दाबलेला सुस्कारा सहज निसटून गेलेला रमेच्या नजरेत आला.

तिचा हात ओढून आपल्या हृदयावर ठेवून ती उगीच राहिली.

मन थोडेसें आटोक्यांत येतांच विश्वेश्वरी पुढें म्हणाली, " रमा, पोटचा गोळा म्हणजे काय हें एका आईलाच कळतं. बेशुद्ध झालेल्या वेणीला ज्यावेळीं त्यांनीं धरून उचलून डोलीन ठेवल आणि हॉस्पिटलात न्यायला निघाले, त्यावेळीं मला काय वाटलं हें तुला समजावून सांगता यायच नाहीं. तरीही मी कुणाला शाप दिला नाहीं की कुणा माणसाला दोष देण्याइतकंसुद्धां मला कांहीं वाटलं नाहीं. धर्मान दिलेली शिक्षा आपला पोटचा गोळा म्हणून आईच्या तोडाला कुलूप लावू शकत नाहीं हे मी कधींच विसरलें नाहीं पोरी."

थोडा वेळ विचार करून रमा म्हणाली, " तुझ्याबरोबर मी वाद घालीत बसत नाही काकू, पण असं जर आहे तर रमेशदादा जो आज दुःख भोगतो आहे

तें कोणत्या पापामुळ ? आम्हीं होऊन त्याला तुरुगात डाबून आलो हे आतां सर्वानाच कळून चुकलंय. "

"नाहीं पोरी," काकू म्हणाली, "तसं नाहीं. 'म्हणूनच वेणी आज हॉस्पिटलात पडलाय. अन् तूं देखील—" बोलता बोलतां ती एकदम थाबली. जे शब्द तिच्या जिभेवर आले होते ते तसेच बळेंबळें गिळून ती म्हणाली, "समजलीस पोरी, कोणतही काम केलं, तर ते केव्हांच वाऱ्यावर विरघळत नाहीं. ती त्या कामाची शक्ति कुठ ना कुठं तरी जाऊन कांहीं ना काहीं तरी घडवून आणते. पण हें असं कसं होत हें सदोदित टिपून सांगतां येत नाहीं, म्हणूनच आजपर्यंत एकाच्या पापासाठीं दुसऱ्याला प्रायश्चित का मिळतं या प्रश्नाचं उत्तर कुणाला देता आलं नाहीं. पण हें प्रायश्चित कराव लागत यात मात्र एव्हढासुद्धा संदेह नाहीं."

स्वतःचे वर्तन आठवून रमेनें सहज एक सुस्कारा सोडला. विश्वेश्वरी बोलत होती, "-यामुळ माझेदेखील डोळे उघडले रमा-बर कराव म्हटलं म्हणून काहीं बर करता येत नाहीं. आधीं बऱ्याचशा लहान मोठ्या पायऱ्या चढून जाण्याइतक धैर्य अगीं हवं. एक दिवस रमेश हताश होऊन माझ्याकडे येऊन म्हणाला, 'यांच्या कल्याणाची काळजी मी कशाला घेऊं काकू ? मी जिकडून आलों तिकडे निघून जातों.' तेव्हा मी त्याला दाबलं आणि म्हटल, 'नाहीं रमेश, एकदा कामाला हात घातला आहेस-तें अर्ध टाकून पळून जाऊं नकोस' तो कधींच माझ्या शब्दाबाहेर गेला नाहीं. जेव्हा त्याला तुरुगाची शिक्षा झाल्याचं मला कळलं त्यावेळीं मला वाटलं, कीं मीच त्याला धरून बांधून नेऊन तुरुगांत घातलं पण त्यानंतर वेणीला हॉस्पिटलांत घेऊन गेले तेव्हा पहिल्यानं मला कळून आलं-नाहीं, नाहीं, त्याला देखील तुरुंगांत धाडलं पाहिजे होतं. लोकाचं कल्याण करण्यासाठीं बाहेरून इथ येण्यांत केव्हढी विटंबना आहे—ते केव्हढं कठीण काम आहे हें तरी मला कुठं माहीत होतं पोरी ? आधीं जमून आल पाहिजे. सर्वाच्या बऱ्यावाईटांत साखर मिसळून गेल्याशिवाय केव्हाही कुणाच कल्याण करतां येत नाहीं —ही गोष्ट कांहीं माझ्या ध्यानीं आली नव्हती. पहिल्यानंच तो आला तेव्हांपासून शिक्षण म्हणा, संस्कार म्हणा कळकळ म्हणा कीं धैर्य म्हणा-तो असा एव्हढ्या उंचावर येऊन उभा राहिला कीं शेवटपर्यंत त्याचा कुणालाच अंत लागला नाहीं.

पण तें कांहीं माझ्या नजरेला आलं नाहीं. मी त्याला जाऊंही दिल नाहीं अन् राहूनही घेतल नाहीं. ”

रमा कांहीं तरी बोलणार होती—पण एकदम थांबली, त्याचा अदाज येऊन विश्वेश्वरी म्हणाली, “नाहीं, रमा, मला त्याचा पश्चाताप होत नाहीं. पण मी म्हणते, त्याबद्दल वाईट वाटून घेऊ नकोस पोरी. यावेळीं तुम्ही त्याला खालीं ओढून सर्वांच्या जोडीला आणलं त्यात तुमच्या हातून मोठं पाप झाल खर, पण आता जो तो फिरून परत येईल तो अगदीं अचुक योग्य जागीं येईल हें मी बजावून सांगते.”

तिच्या बोलण्याचा उद्देश न कळल्यामुळे रमा म्हणाली, “पण यामुळं तो खालीं का येतो काकू ? आम्ही अन्याय केला, पाप केल, त्याचं फळ त्याला भोगाव लागलं, यातनाही त्यालाच झाल्या–पण आमच्या पापासाठीं आम्ही नरकात जायचं ते बाजूलाच राहून त्याला का हा डाग लागला ? ”

अगदीं केविलवाणें हसून विश्वेश्वरी म्हणाली, “ डाग लागणारच पोरी. नाहीं तर पाप एव्हढ भयकर का ठरल असतं ? उपकाराचा प्रत्युपकार कुणी जरी केला नाहीं, एव्हढच काय, उलट अपकारही केला तरीही या कृतघ्नतेला जो कारण होतो त्याची जर अधोगती झाली नाहीं तर त्यात मिळाल काय कीं गमावलं काय ! तू म्हणशील पोरी, कीं रमेश येईल तेव्हां त्याला तुझं हें कुंवापूर तसंच का दिसेल ! तो पुनः आला तर तुला अगदीं स्पष्ट दिसून येईल, कीं ज्या उजव्या हातच दान भैरवान घेतलं आहे तो आपला उजवा हातसुद्धा तोच मुरगळून टाकील. ”

थोडावेळ थाबून ती आपल्याशींच म्हणाली, “–पण कुणी सांगावं कदाचित् झालं ते बरच झालं असेल. त्याच्या मजबूत हातच्या बेफाम देणग्या घेण्याची ताकदच जर लोकांच्या ठायीं नसेल तर तो त्याचा मोडका हातच त्याला खरा कामीं लावता येईल ! ” असें म्हणून तिनें एक गभीर सुस्कारा सोडला.

रमा तिचा हात धरून उगीच त्याच्याशीं खेळत होती. हळूहळू मोठ्या काकुळतवाणीने ती म्हणाली, “ बर काकू, खोटी साक्ष देऊन निरपराधी माणसाला शिक्षा करायला लावणाराला कोणती शिक्षा आहे ? ”

विश्वेश्वरी खिडकीबाहेर पहात होती. रमेच्या रुक्ष केसांत बोटे फिरवीत ती उगीच बसली होती. तिला दिसून आले, रमेच्या झाकलेल्या दोन्ही डोळयांच्या कोपऱ्यांतून अश्रू वहात होते. मोठ्या प्रेमानें ते अश्रू पुशीत ती म्हणाली, “ पण तुझ्या हातीं कांहींच नव्हतं पोरी. बायकांच्या जातीला कलंकाची भीती दाखवून

ज्या भेकडानीं तुला अशा संकटात घातल, त्याच्यावरच साऱ्या पापांचा बोजा आहे. तुझ्यावर त्याचा एव्हढामुद्धां भार नाहीं–" असे म्हणून तिनें पुनः तिचे डोळे पुसून घेतले. तिच्याकडून एव्हढें हें आश्वासन मिळतांच थोपवून धरलेलीं आंसवें रमेच्या डोळयातून पूरासारखीं वाहू लागलीं. थोड्या वेळानें ती म्हणाली, " पण ते त्याचे शत्रू म्हणतात, ' शत्रूचा नाश करण्यासाठीं काय वाटेल ते करण्यात दोष नाहीं. " पण मी कांहीं अस म्हणत नाहीं काकू. "

" का तसं म्हणत नाहींस पोरी ?" असे विचारताना तिची नजर खालीं गेली. अकस्मात तिच्या डोळ्यासमोर जशी काही वीज चमकून गेली. जो झाकलेला सशय कधीं तरी एकदा तिच्या मनाची निष्कारण चाळवाचाळवी करीत होता, तो ते झाकण फेंकून देऊन अगदीं उघडउघड समोरासमोर उभा राहिला. आज ती ओळख पटताच विश्वेश्वरी क्षणभर जितकी आश्चर्यचकित झाली तितकेंच तिला दु:ख वाटले. रमेच्या हृदयातला रोग यापुढे तिला अपरिचित राहिला नाहीं.

रमेने डोळे मिटले होते म्हणून विश्वेश्वरीच्या मुद्रेचा भाव तिला दिसला नाही. तिनें हाक मारली, " काकू. "

आश्चर्यचकित होऊन काकूने तिचे डोके फिरवून घेऊन ओ दिली. रमा म्हणाली, " काकू, आज तुझ्यासमोर एक गोष्ट उघड करून सांगणार आहे. पीरपूरच्या जाफरअलीच्या घरीं रोज संध्याकाळी गावचे तरुण गोळा होऊन रमेशदादाच्या शिकवणीप्रमाणे काहीं तरी चागलींच कामं करीत होते. त्याना बदमाष ठरवून पोलिसाच्या तावडींत द्यायचा बेत चालला होता—मी माणूस पाठवून त्या लोकाना सावध केल. पोलीस सधी पहात होते. एकदा ते त्याच्या हातीं पडले असते म्हणजे पुढं सुटका नव्हती. "

ते ऐकनाच विश्वेश्वरी शहारून उठली. म्हणाली, " म्हणतेस तरी काय ? खोटा बनाव करून पोलिसांचा वाघ स्वतःच्या गांवात चुडीन घरांत घेण्याचा का वेणीचा बेत होता ? "

" म्हणूनच मला वाटत, " रमा म्हणाली, " बड्यादादाला शिक्षा मिळाली, हे त्याचंच फळ. मला क्षमा करशील काकू ? "

खालीं वांकून विश्वेश्वरीनें तिचा मुका घेतला. ती म्हणाली, " आई होऊन जर मी क्षमा केली नाहीं तुला तर दुसरे कोण करणार रमा ? माझा तुला आशीर्वाद आहे. या सत्कार्याचं योग्य बक्षीस तुला ईश्वर देईल. "

हातानें डोळे पुशीत रमा म्हणाली, " एव्हढच मला समाधान वाटतं काकू, कीं तो सुटून परत येईल त्यावेळीं त्याच आवडत क्षेत्र त्याला तयार असलेल दिसेल. त्याला तेंच हव होतं. गांवचे कामकरी-शेतकरी जागे होऊन उठायला पाहिजे होते. त्यानं त्यांना ओळखल, त्यांच्यावर त्याचा लोभ जडला म्हणजे त्या लोभाच्या, त्या प्रेमाच्या आनदात तो माझा अपराध विसरून नाहीं का जाणार काकू ? "

विश्वेश्वरीच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. नुसता तिच्या डोळयातल्या आसवाचा एक मोठा थेंब रमेच्या कपाळावर पडला. कितीतरी वेळ त्या दोघीही स्तब्ध बसून राहिल्या होत्या.

रमा उद्गारली, " काकू ! "

विश्वेश्वरी म्हणाली, " काय पोरी ? "

रमा म्हणाली, " फक्त एवढ्या या एकाच बाबतींत आम्हीं दूर गेलों नाहीं. आम्हा दोघाचही मन तुझ्याकडे ओढत होत.—"

विश्वेश्वरीनें खालीं वाकून पुनः तिचा मुका घेतला.

रमा म्हणाली, " त्या ओढीच्या आधारावरच मी एक काम तुला सागणार आहें. मी गेलें अन् तरीही त्यान जर मला क्षमा केली नाहीं, तर माझ्या वतीन त्याला एव्हढंच सांग काकू, कीं त्याला वाटत होत तितकी मी वाईट नव्हते. जेव्हढे क्लेश मी त्याला दिले त्याच्या हजारपट यातना मी अनुभवल्या आहेत— तूच त्याला हें सांगितलंस तर खर वाटेल."

विश्वेश्वरी तिच्या अंगावर आडवी पडून तिला कवटाळून रडूं लागली. ती म्हणाली," चल पोरी, आपण कुठ तरी तीर्थक्षेत्रीं जाऊन राहू. जिथं वेणी नाहीं अन् रमेशही नाहीं—जिथ डोळे वर केले कीं देवाच्या देवळाचं शिखर डोळ्यासमोर दिसेल—तिथं आपण जाऊं. मला आतां सार कळून चुकलंय रमा. जायची वेळ जवळ आली तर पोरी, हे विचार हृदयात ढांसळून जळून चितेत मरत मरत तिथं जाऊन चालणार नाहीं. आम्हीं ब्राह्मणाच्या बायका — ज्या दिवशीं तिथं जायचं त्या दिवशीं तशाच निर्मळपणानं गेलं पाहिजे आम्हांला."

कितीतरी वेळ रमा उगीच पडून राहिली होती. एक कडकडता दीर्घ निःश्वास आवरीत आवरीत ती नुसती म्हणाली, " मला तसंच जायचंय काकू."

# १८

तुरुंगाच्या दरवाजाबाहेर येतांच साऱ्या दुःखांचें सार्थक करण्याची योजना ईश्वरानें अशा प्रकारे करून ठेविली असेल असे रमेशाच्या ध्यानींमनींही नव्हते. सहा महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा भोगून सुटका होऊन तुरुगाच्या बाहेर पाऊल टाकताच त्याला विलक्षण दृश्य दिसून आलें. डोक्याला चादर गुंडाळून स्वतः वेणीबाबू सर्वांच्या पुढे उभा होता. त्याच्या मागेच दोन्ही शाळांचे मास्तर, पडित, विद्यार्थ्यांचा घोळका आणि कित्येक हिंदुमुसलमान रयत होते.

रमेशला जोरानें मिठी मारून रडत रडत वेणीबाबू म्हणाला, " भाईराया, रक्ताचा ओढा हा असा विलक्षण असतो हें आज मला कळलं. जदू मुकर्जीची मुलगी त्या हरामजाद्या आचार्याचा हात धरून असं वैर साधील, लाजलज्जा कोळून पिऊन खोटी साक्ष देऊन तुला अशा क्लेशांत पाडील हे मला माहीत असतानासुद्धा मी तिकडे डोळेझांक केली, त्याची देवान मला चांगलीच शिक्षा दिली. तुरुगात तू सुखान होतास रमेश, पण इकडे मी बाहेर सहा महिने सारखा जळत्या वणव्यांत पेटत होतों."

काय करावे आणि काय बोलावें हे रमेशला कळेना. तो नुसता सुन्नपणे पहात राहिला. हेडमास्तर महाशयानीं एकदम साष्टांग नमस्कार घालून त्याच्या पायावर डोके ठेवले. त्याच्यामागें असलेल्या लोकातील कुणी आशीर्वाद, कुणी सलाम, कुणी प्रणाम करीत सारा रस्ता गजबजून टाकीत होते.

वेणीबाबूचें रडें कांहीं केल्या आवरत नव्हते. भरून आलेल्या आवाजानें तो म्हणाला, " आपल्या दादावर आतां राग करूं नकोस भाई. आता घरीं चल. रडून रडून आई आंधळी व्हायच्या बेताला आली आहे."

घोड्याची गाडी उभी होती. उगीच बोलण्याच्या भानगडींत न पडता रमेश जाऊन गाडींत बसला. वेणीबाबूही त्याच्या समोरच्या बैठकीवर बसला. त्यानें डोक्याला गुंडाळलेली चादर सोडून ठेवली. जखम वाळून गेली होती तरी फटक्याचा वण ढळढळीत दिसत होता.

एक मोठा दीर्घ निःश्वास सोडून उजवा हात उलटा करीत वेणीबाबू म्हणाला, " कुणाला दोष द्यायचा भाई ? हें माझ्या स्वतःच्याच कर्माचं फळ ! माझ्याच

पापाचं प्रायश्चित्त! पण कशाला त्या गोष्टी?—" असें म्हणून चेहऱ्यावर पश्चात्तापाचा मोठा आवेश आणून तो उगीच राहिला.

स्वतःच्या तोंडानें स्वतःचा गुन्हा तो कबूल करीत असलेला पाहून रमेशाचें अंतःकरण पाझरलें. कांहींतरी विशेष झालें आहे असें त्याला वाटलें खरें, पण ती हकिकत ऐकण्याबद्दल त्यानें उत्सुकता दाखविली नाहीं.

पण जी प्रस्तावना केली तिचा काहीं उपयोग होत नाहीं असें पाहून वेणीबाबूचा जीव खालींवर होऊं लागला. एक दोन मिनिटें न बोलतां गेलीं. पुन. एक मोठा सुस्कारा सोडून त्यानें रमेशाचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें. तो हळुहळू बोलू लागला, " पहिल्यापासूनच हा माझा मोठा दोष. मनात एक बाहेर एक असं मला कधींच करतां येत नाहीं. इतर चार लोकांप्रमाणे मनच्या गोष्टी मनात झाकून ठेवता येत नाहींत, म्हणून हे असे प्रसंग येतात तेव्हां माझे डोळे उघडतात—"

रमेश काहींच न बोलता ऐकतो आहे असें पाहून वेणीबाबू आपला आवाज जरा जास्त कोमल, जरा जास्त गंभीर करून बोलू लागला, " माझ्या हातून अपराध घडला—पण त्या दिवशीं मनींच्या यातना दाबून ठेवणं कठीण झालं. तेव्हा मी रडलों खरा पण मी स्वच्छ सागितल, ' रमा, आम्ही असा कोणता गुन्हा केला म्हणून तूं आमचा सर्वनाश केलास ? कैदेची शिक्षा झाली हें कळलं तर आई एकदम जीव साडील. आम्हीं भाऊभाऊ हक्कासाठीं झगडा करू किंवा काहीं करूं—पण किती झालं तरी तो भाऊ आहे. एका फटक्यासरशीं तूं माझ्या भावाला मारलंस तसं आईलाही मारलंस! आता निर्दोषी माणसाचा आसरा ईश्वर आहे ! " असे म्हणून त्यानें गाडीच्या बाहेर डोकावून आकाशाकडे पाहिलें आणि पुनः एकदां आपली फिर्याद ईश्वराकडे सूपूर्द केली.

रमेश या भाषणांत जरी भाग घेत नव्हता तरी मनःपूर्वक ऐकत होता. थोडा थांबून वेणीबाबू म्हणाला, " रमेश, रमेचा तो अवतार आठवला म्हणजे यावेळीं माझ्या काळजाला थरकांप सुटतो. करकर दांत वाजवीत ती म्हणाली, ' रमेशाचा बाप माझ्या बापाला तुरुंगांत घालणार होता नव्हे का ? संधि मिळाली असती तर सोडलं असतं का त्यान ? ' बायकांच्या जातींत एव्हढी मग्रुरी पाहून मला मोठी चीड आली रमेश. मी देखील रागारागानें तिला म्हटलं, ठीक आहे तो सुटून तर येऊं दे. मग काय तें पहातों. "

अजूनपर्यंत वेणीबाबूच्या भाषणाचें धोरण रमेशच्या लक्षांत ठीक रीतीनें येत नव्हते. रमेच्या बापाला त्याच्या बापानें तुरुंगांत घालायचा बेत केव्हा केला होता ते त्याला माहीत नव्हते. पण गांवांत पाऊल ठेवल्याबरोबर पहिल्यानेच रमेच्या मावशीच्या नोंडून त्याने ही हकिकत ऐकली होती. म्हणूनच पुढली हकीकत ऐकण्यासासाठीं तो उत्सुक झाला.

वेणीबाबूच्या ते लक्षात आलें. तो म्हणाला, "खून करायची सवयच आहे ना त्याची? लाठीवाल्या अकबराला पाठवला होता तें आहे ना ध्यानात? पण तू कसला वस्ताद! तिचा डाव तिच्यावरच उलटवलास. पण माझी काय स्थिति झाली पाहिलीस? मी हा असा दुबळा—" असे म्हणून थोडा विचार करून वेणीबाबूनें कलूच्या मुलाने आपल्याला कसे फटकावले याची कल्पित हकिकत आपल्या काळ्या काळजातून बनवून, आपल्या भाषेनें जुळवून घेऊन, त्याला त्यानें सांगितली

"मग पुढं?" रमेश उत्सुकतेनें म्हणाला.

"मग पुढ काय मला शुद्धि होती भाई?" बळेच केविलवाणे हसू चेहऱ्यावर आणून वेणीबाबू म्हणाला, "कुणी कस मला हॉस्पिटलात नेल, तिथ काय झालं, कुणी माझी शुश्रुषा केली, काहींसुद्धां आठवत नाहीं. दहा दिवसानतर शुद्धीवर आलो अन् पाहिलं तर हॉस्पिटलांत आहे. ही जी यमाची चिठ्ठी फिरली ती केवळ आईच्या पुण्याईनं कुणाला लाभली आहे का अशी आई?"

रमेशला काहींच बोलता येईना. तो दगडाच्या पुतळ्यासारखा स्वस्थ बसून राहिला होता. त्याच्या हाताचीं दाहीं बोटें आवळत जाऊन कडकड मुठी वळत होत्या. रागानें तो चिडून गेला होता. द्वेषाचा जाळ त्याच्या मस्तकात एव्हढा पेट घेऊं लागला होता कीं त्याचें मोजमाप घेणे कुणालाच शक्य झालें नसते.

वेणीबाबू किती हलकट होता हें त्याला माहीत होते. वाटेल तें करायला त्यानें मागेंपुढें पाहिलें नसते हेंही तो जाणत होता. पण इतक्या खोट्या गोष्टी इतक्या बेछूट बनावटपणानें माणसाच्या जातींतला कुणी अशा रीतीनें बेधडक सागू शकेल अशी कल्पना करण्याइतका त्यावेळीं त्याच्या मनावर त्याचा ताबा नव्हता. म्हणूनच वेणीनें रमेवर केलेले सारे आरोप त्याला खरे वाटले.

तो गांवांत येतांच गावभर केव्हढा तरी मोठा उत्सव सुरू झाला. रोज सकाळीं दुपारीं आणि रात्रींपर्यंत इतकीं माणसें येत होतीं, एवढ्या गप्पा गोष्टी झडत

होत्या, आपुलकीची भावना एव्हढी दिसून येत होती, कीं तीमुळे तुरूंगांत झालेल्या क्लेशांची जी कांहीं थोडीबहुत ग्लानी त्याच्याठायीं शिल्लक राहिली होती ती पहाता पहाता निवारली गेली.

त्याच्या गैरहजेरींत गावात सामाजिक सुधारणेचा मोठा झोत उलटून गेला होता त्यांत सशय नव्हता, पण या चारसहा महिन्यांत एव्हढी मोठी उलटापालट कशी होऊ शकली याचा जेव्हा तो विचार करू लागला त्यावेळीं त्याला असे दिसून आलें, की वेणीबाबूच्या विरोधाचा जोर असल्यामुळे ज्या गोष्टी पूर्वीं होऊं शकत नव्हत्या—तशाच थाबून राहिल्या होत्या—त्या गोष्टी त्याच्या अनुकूलतेमुळे दुप्पट जोरानें अमलात येऊ लागल्या होत्या.

आता त्याला वेणीबाबूबद्दल चागलीच कल्पना आली. हा माणूस भानगड्या आहे हे जरी सर्वाना कळत होते तरी गावच्या लोकाना त्याने कशा रीतीनें आपल्या काबूत ठेवलें होते हें रमेशला आता दिसून येऊं लागले. पूर्वीं त्याला हें कळत नव्हते. त्याच्या विरोधाचे बधन दूर होताच रमेशला हायसे वाटूं लागले.

एव्हढेंच नव्हे, तर रमेशच्या बाबतींत जे अत्याचार झाले त्याचा गावच्या लोकाच्या मनावर कसा परिणाम झाला याच्या हकिकती सर्वांनीं हळूहळू निरनिराळया प्रकारे त्याच्या कानीं घातल्या. या सर्वांची सामुदायिक सहानुभूति जशी मिळत होती, तसाच वेणीबाबूही आपल्या बाजूला आला आहे असे पाहून, आनदानें आणि उत्साहाने त्याचें हृदय फुलून उठत होतें.

सहा महिन्यापूर्वी त्यानें ज्या कामांना आरभ केला होता तीं कामें अर्धीच टाकून त्याला जावें लागलें होतें. आतां दुप्पट उत्साहानें तीं पुरी केली पाहिजेत असा रमेशनें सकल्प केला आणि कांहीं दिवसपर्यंत तो स्वतः या साऱ्या आनंदोत्सवात मिसळून साऱ्या लहानमोठ्या गांवकऱ्यांच्या घरीं सर्व बाबतींत त्यांची खबर घेत दिवस कंठू लागला.

एकाच विषयापासून तो दूर राहाण्याचा जोरांत प्रयत्न करीत होता—एक रमेच्या बाबतींत ! ती आजारी आहे हें त्याला वाटेंतच कळलें होते. पण तिचा आजार कोणत्या थराला गेलेला आहे याची चौकशी करण्याचें त्यानें बुद्धिपुरस्पर टाळलें. तिची आणि आपली आतां कायमची ताटातूट झालेली आहे असें याच्या मनानें घेतलें होतें.

आपल्या साऱ्या दुःखक्लेशाचें मूळ म्हणजे केवळ रमाच, असें गांवांत

आल्यापासून प्रत्येकाच्या तोंडून तो ऐकत होता. अर्थात या बाबतींत तरी वेणी-बाबूने खोटे सांगितलें नाहीं याबद्दल त्याला शंका राहिली नव्हती.

पांच सहा दिवसांनीं वेणीबाबूने येऊन रमेशला गळ घातली. पीरपूरच्या एका मोठ्या जागेच्या भागीबद्दल पुष्कळ दिवसांपासून रमेबरोबर त्याचा झांकला वाद उत्पन्न झाला होता. ती इस्टेट ताब्यांत घ्यायला ही संधी बरी आहे, असाच वेणीबाबूच्या सांगण्याचा उद्देश होता. वेणीबाबू बाहेर काही बोलो, पण आंतून तो रमेला फार भीत असे. सध्यां ती आजारी असल्यामुळे दावे-कोर्टाच्या भानगडींत पडणें शक्य नव्हते. शिवाय रमेशनें सांगितलें असते तर तिथली मुसलमानी रयत विरुद्ध जाणार नव्हती. पुढें कांहीं होवो पण ही संधी साधून एकदम ताबा घ्यावा, पुढें अशी संधि मिळणार नाहीं, असा हट्ट धरून तो बसला.

रमेशला आश्चर्य वाटलें. त्याला ती गोष्ट पटेना. तेव्हां युक्तिप्रयुक्ती योजित वेणीबाबू शेवटीं म्हणाला, "का करायच नाहीं अस ? संधि सापडताच तिनं तुला पेंचात धरलं, त्या तिच्या आजारीपणाचा हिशेब कसला धरतोस ? तुला तिनं तुरुंगांत पाठवलं त्यावेळीं तूं देखील आजारी नव्हतास असं नाहीं !"

गोष्ट खरी होती. ती नाकबूल करणें रमेशला शक्य नव्हते. पण का कोण जाणें, रमेशीं विरोध करायला त्याचें मन तयार होत नव्हतें. हजार प्रकारे वेणी-बाबूनें त्याला चीड आणण्याचा प्रयत्न केला, तरी रमा अशा रीतीनें आजारी-पणांत दुबळी होऊन पडली असतां तिच्याशीं विरोध करणें त्याला कठीण वाटूं लागलें. एव्हढा मोठा विरोध अशा रीतीनें कां आकसून जातो याचें कारण त्याचें त्यालाच कळेना.

रमेश उगीच राहिला. माती मऊ सांपडल्यावर केव्हां खणायचें याची अटकळ वेणीबाबूला होती. पूर्वीसारखी जास्त जिद्द न करतां तो निघून गेला.

यावेळीं आणखी एक गोष्ट रमेशाची दृष्टी वेधून घ्यायला कारणीभूत झाली. पूर्वीपासूनच त्याला माहीत होतें, कीं संसारांत कोणत्याच बाबतींत विश्वेश्वरीची आसक्ती नव्हती. पण ती तिची वृत्ति अनासक्त तिटकाऱ्याच्या स्वरूपांत परिणत झाली आहे असें परत आल्यावर त्याला वाटूं लागलें.

तुरुंगांतून सुटून आल्यावर वेणीबाबूबरोबर ज्यावेळीं तो घरीं आला त्यावेळीं विश्वेश्वरीला आनंद झाला. गहिंवरल्या स्वरांत तिनें त्याला असंख्य आशिर्वाद

दिले. पण त्या आशीर्वादांतसुद्धां जें काहीं एक दिसून येत होते ते त्याच्या अंतःकरणाला जाणवल्यावांचून राहिले नाहीं.

आज सहज बोलतां बोलतां त्याला कळलें, कीं विश्वेश्वरीनें काशीयात्रेला जाण्याचे ठरवले असून पुनः परत येण्याचा तिचा उद्देश नाहीं. ही बातमी ऐकताच तो चमकला. ती का जाणार हें कुणालाच माहीत नव्हते. अनेक कामांमुळे पांच सहा दिवसात त्याला तिची भेट घेतां आली नव्हती. पण ज्या दिवशीं तो भेटला त्यावेळीं ती या बाबतींत काहींच बोलली नाहीं.

आपण होऊन आपल्या किंवा दुसऱ्याच्या बाबतींत उठाठेवी करणें तिला आवडत नसे हे रमेशला माहीत होते. तरीही आज कळलेल्या हकिकतीबरोबर पूर्वीची आठवण डोळ्यासमोर आणतांच त्याला या तिच्या वैराग्यांतले मर्म कळून येऊ लागलें. काकू कायमचा निरोप घेऊन जाणार याच्याबद्दल त्याला आता एव्हढा सुद्धा संशय राहिला नाहीं. तिच्या गैरहजेरींतच तिचा भाव जाणवेल! तिची खरी किमत काय याची कल्पना येऊन त्याचे दोन्ही डोळे भरून आले. एक क्षणाचाही विलंब न लावता तो तिला भेटायला तिच्या घरीं गेला.

त्यावेळीं ९–१० वाजले होते. आत येतांच मोलकरणीनें सागितलें कीं ती मुखर्जींच्या घरीं गेली होती.

रमेशने आश्चर्यचकित होऊन प्रश्न केला, "अशी भलत्याच वेळीं का गेली काकू?"

ही मोलकरीण फार जुनीपुराणी होती. ती हसून म्हणाली, वेळ अवेळ कधीं पहातात आई? शिवाय त्यांच्या छोट्याबाबूची मुंज आहे ना!"

यतीनची मुंज!

रमेश आणखी आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "कुणालाच कसं माहीत नाहीं हे!"

"कुणाला कळवलंच नाहीं त्यांनीं. कळवल तरी कुणी कांहीं त्याच्या घरीं जाणार नाहीं. रमाताईला त्यांनीं वाळींत टाकल आहे ना!"

रमेशच्या आश्चर्याला सीमा राहिली नाहीं. थोडा वेळ विचार करून ज्यावेळीं त्याने कारण विचारलें त्यावेळीं ती मोलकरीण लाजेनें मान फिरवून म्हणाली, "काय सांगूं छोटेबाबू, रमाताईच्या बाबतींत भलभलत्या कंड्या पिकल्या

आहेत ना ? आम्ही गरीब माणसं—असल्या घाणेरड्या गोष्टी आम्ही हिशेबात घेत नाहीं छोटेबाबू—" असे म्हणून ती एकदम तिथून निघून गेली.

कांहीं वेळ उगीच राहून नंतर रमेश घरीं निघून आला. त्याने कुणालाच विचारलें नाहीं. त्यानें अंदाज केला, कीं हा वेणीबाबूच्या सूडाचाच प्रताप. पण वेणीबाबूचा हा राग का ? कोणत्या गोष्टीचा सूड उगवण्यासाठीं त्याने कोणत्या घाणेरड्या प्रकारे रमेची बदनामी चोंहीकडे केली होती, याचा अचूक अदाज करणे रमेशला शक्य नव्हते

## ११

त्या दिवशीं दुपारीं एक विलक्षण प्रकार घडून आला. कोर्टाची कदर न करतां साक्षी पुरावा बरोबर घेऊन कैलास न्हावी आणि शेख मोतीलाल रमेशला शरण आला.

रमेश उघडउघड आश्चर्यचकित झाला आणि म्हणाला, " माझं सागणं तुम्ही कुठं ऐकणार आहात बाबानो ? "

वादी-प्रतिवादी दोघेही म्हणाले, " का ऐकणार नाहीं बाबू ? जज्जापेक्षा आपली अक्कलहुषारी काय कमी आहे ? आणि जज्ज न्यायाधीश जसे आहेत तसेच आपण चारजण गृहस्थमाणूसही आहात ना ! उद्या आपण सरकारी नोकरी पत्करली, मुनसफ झालात, खटला चालवून निकाल दिलात, तर तो आम्ही मान्य करणारच ना ? त्यावेळीं तर नाहीं म्हणून चालायचं नाहीं ! "

त्याचें हें भाषण ऐकून रमेशचें हृदय आनंदानें फुलून उठले.

कैलास म्हणाला, " आपल्यासमोर आम्हीं दोघेही मनांतल्या चार गोष्टी उघड करून बोलं–कोर्टांत तसं चालायचं माहीं. शिवाय गाठीला जी काय दमडीदुगाणी आहे ती वकिलाला दिली नाहीं तर खटला चालायचा नाही. इथ एक पैशाचा खर्च नाहीं, वकिलाची खुषामत करायला नको, गावोगांव पायपीट करायला नको ! नाहीं बाबू, आपण जो हुकूम कराल—मग तो बरा असो कीं वाईट असो—आम्ही त्याला राजी आहों. आपला आशिर्वाद घेऊन आम्ही मुकाट्यानं घरीं निघून जाऊ. देवान बुद्धी दिली, म्हणूनच आम्ही दोघेही कोर्टाच्या दारां-तून परतून आपल्या पायांजवळ आलों आहोंत."

एका नाल्यासंबंधीं दोघाचा तटा होता. या बाततींतलीं जीं काहीं खतेपत्रें होतीं तीं त्यानीं रमेशच्या हवालीं केलीं आणि दुसऱ्या दिवशीं भेटायला येण्याची बोली करून दोघेही आपल्या बरोबरचीं माणस घेऊन निघून गेले.

ते निघून जातांच रमेश स्तब्ध होऊन बसला. त्याच्या कल्पनेपलीकडच्या गोष्टी घडून येत होत्या. अगदीं दूरच्या भविष्यकालातसुद्धा असे काहीं होईल अशी आशा त्याच्या मनात उत्पन्न झाली नव्हती. या प्रकारची मीमांसा पुढे त्याच्या ध्यानी येवो वा न येवो, पण आज हे लोक सरकारी कोर्टाच्या बाहेर तटा मिटवण्याच्या उद्देशानें कोर्टाच्या रस्त्यावरून मागें फिरून आले आणि आपल्याला निकाल देण्याची त्यानीं विनति केली, हें पाहून त्याचे हृदय आनदानें भरून गेले.

यात काहीं विशेष नव्हतें. गावचीं दोन सामान्य माणसे—त्याच्यामधल्या तंट्याची क्षुल्लक बाब–पण या क्षुल्लक बाबीचा धागादोरा पकडून भविष्यकाळच्या किती तरी सुधारणाच्या आकाक्षाचे मनोरे तो आपल्या मनांत बाधू लागला. आपल्या या अभागी जन्मभूमीसाठी आता पुढे आपल्याला कोणतीही गोष्ट करणे अशक्य नाही असे त्याला वाटू लागलें. आता आपण काय करूं आणि काय करणार नाहीं असे त्याला होऊन गेले. कर्तृत्वाच्या साऱ्या कल्पित मर्यादा कोसळून पडल्या.

बाहेर वसंत ऋतूंतील चादण्याने आकाश डवरले होते. तिकडे पहात असताना त्याला एकदम रमाची आठवण झाली. यापूर्वी अशी आठवण झाली तर त्याच्या अंगाचा भडका उडत असे पण आज भडका उडणे तर दूरच राहो, एव्हढी लहानशी झळसुद्धा त्याला जाणवली नाहीं. मनातल्या मनात हंसून तो तिला उद्देशून म्हणाला, "तुला कारणीभूत करून ईश्वरानं मला अस कामीं लावल. तुझ्या विषातून माझ्या भाग्यान अस अमृत जन्माला येणार हें जर तुला कळल असत रमा, तर मला वाटत, मला तुरुंगात घालावं अस तुला केव्हाच वाटल नसत !—कोण आहे ?"

"मी राधा ती, छोटेबाबू. रमाताईनं आत्ताच्या आत्तां भेटायला बोलावलंय."

भेटायला बोलावण्यासाठीं रमेने मुद्दाम राधेला पाठवलें! रमेश चकित झाला. कोणती नष्टबुद्धी देवता आज अशा अचानक गोष्टी घडवून खेळ खेळते आहे हो ?

राधा म्हणाली, एक वेळ कृपा करून जर छोटेबाबू—"

"कुठ आहे ती ?"

" पडून आहे घरीं. " थोडें थांबून ती म्हणाली. " उद्यांपर्यंत वाट पहायला वेळ नाहीं. तेव्हां आत्ताच जर एकदां—"

" ठीक आहे. आलोंच. " असें म्हणून रमेश उभा राहिला.

बोलवायला पाठवलें खरे, पण त्याचा परिणाम काय होईल याचा विचार करीत रमा बिछान्यावर पडून राहिली होती.

राधेनें दाखवून दिल्याप्रमाणें रमेश तिच्या खोलींत आला आणि जवळ एक चौकी ओढून घेऊन बसला. केवळ मनाच्या जोरावर तिनें बळेंबळेच रमेशच्या पायाजवळ डोकें ठेवलें.

खोलीच्या एका कोपऱ्यात दिवा मिणमिणत होता. त्या अंधुक प्रकाशात रमेशला जेवढें कांहीं दिसलें तेवढ्यावरून तिच्या शारीरिक अवस्थेचा त्याला अंदाज करता आला नाहीं. मात्र रस्त्यानें येताना त्यानें मनांतल्या मनात जे सकल्प केले होते ते रमेच्या समोर येऊन बसताच सारे मुळांतूनच उलटून पालटून गेले.

थोडा वेळ स्वस्थ बसल्यानतर तो अगदीं नाजूकपणे म्हणाला, " आता प्रकृति कशी काय आहे राणी ? "

त्याच्या पायापासून दूर होऊन जरा बाजूला सरकून बसून रमा म्हणाली, " आपण मला रमाच म्हणत जा. "

आपल्या पाठीवर चाबकाचा फटका बसला असे रमेशला वाटलें. त्याच क्षणीं कठोर होऊन तो म्हणाला, " ठीक आहे. तूं आजारी आहेस अस मी ऐकलं होत, म्हणूनच मी तुझ्या प्रकृतीची चौकशी केली. नाहीं तर नाव कुठलही असो कुठल्याही नांवानं तुला हांक मारायची मला इच्छाही नाहीं आणि जरूरीही नाहीं"

रमेला सारे कांहीं कळलें. थोडा वेळ थांबून ती हळूहळू म्हणाली, " आता बरी आहें—" त्यानंतर ती म्हणाली, "—मी बोलवायला पाठवल म्हणून आपल्याला आश्चर्य वाटलं असेल. पण—"

" मुळींच नाहीं. " रमेश मध्येंच तिरसटपणें म्हणाला, " तुझ्या कोणत्याही वर्तनाबद्दल आश्चर्य वाटायचे माझे दिवस आतां गेले आहेत. मला का बोलावलं होतंस ? "

रमेशचे उद्गार रमेच्या हृदयाला बाणासारखे भेदून गेले, हें त्याला कळले नाहीं कांहींच न बोलतां मान खालीं घालून ती बसली होती.

ती म्हणाली, " रमेशदादा आज दोन कामांसाठीं मी तुम्हांला बोलावल होतं.

मी तुमची किती अपराधी आहें हें मला माहीत आहे, माझी खात्री होती कीं तुम्ही याल अन् माझ्या या शेवटच्या दोन मागण्या कबूल कराल.—"

तिला एकदम भरून आलें आणि तिचा आवाज अडखळला. रमेशला पुरी कल्पना येण्याइतका हा गहिवर स्पष्ट असल्यामुळे एका क्षणात त्याच्या अतःकरणांत पूर्वीचा स्नेह जागा झाला. एव्हढे आघात झाले असतांही तो स्नेह मेला नव्हता–नुसता निर्जीव होऊन राहिला होता—मूर्च्छा येऊन पडला होता—याची जाणीव झाल्यामुळे तो स्वतःच आज आश्चर्यचकित झाला. क्षणभर उगीच राहून तो शेवटीं म्हणाला, "काय आहेत तुझ्या मागण्या ?"

रमेनें आश्चर्यानें एकदां वर पाहिलें आणि पुनः मान खालीं घातली. ती म्हणाली, "तुमची मदत घेऊन बडादादाची इस्टेट काबीज करूं पहातो आहे ती माझी स्वतःची आहे. अर्थात् माझे पंधरा आणे आणि तुमचा एक आणा. हे सारे सोळा आणेच तुम्हाला देऊन टाकणार आहें मी !"

रमेश पुनः भडकून उठला आणि म्हणाला, "चोरी करायला मी यापूर्वी कुणाला मदत केली नाहीं आणि यापुढं करणार नाहीं. काहीं घ्यायचं कारण नाहीं. तुला दानच करायचं असलं तर किती तरी दुसरीं माणस आहेत इथं. मी कुणाच दान घेणार नाहीं."

पूर्वीचा काळ असता तर रमा म्हणाली असती, कीं मुकर्जीकडच दान घेण्यांत घोषालाना अपमान वाटण्याच कारण नाहीं. पण आज हे शब्द तिच्या तोंडून बाहेर पडले नाहींत. ती नम्रपणे म्हणाली, "चोरी करायला तुम्ही कुणाला मदत करणार नाहीं, हे मला माहीत आहे रमेशदादा ! अन् घ्यायच असलं तर त्याला स्वतःसाठीं घेणार नाहीं तेही मला माहीत आहे. पण हें तस नाहीं. गुन्हा केला तर शिक्षा झाली पाहिजे. मी जेव्हढे गुन्हे केले आहेत त्या गुन्ह्यांची शिक्षा म्हणून कां घेत नाहीं हे ?"

रमेश काहीं वेळ उगीच राहिला आणि म्हणाला, "तुझी दुसरी मागणी !"

माझ्या यतीनला मी तुमच्या हातीं देते." रमा म्हणाली, 'तुमच्यासारखाच करा त्याला. मोठा झाला म्हणजे तुमच्यासारखाच हंसतमुखानं स्वार्थत्याग करायला तो तयार झाला पाहिजे."

रमेशच्या अंतःकरणांतला सारा कठोरपणा विरघळून गेला. पदरानें डोळे पुसून रमा म्हणाली, "–या डोळ्यांनीं तें पाह्यचं भाग्य दिसत नाहीं. पण यतीनच्या

नसात त्याच्या वाडवडिलाचं रक्त आहे हे मला पक्कं माहीत आहे. त्याग करण्याची ताकद त्याच्या हाडामासातून खिळलेली आहे. योग्य शिक्षण मिळाल तर उद्यां तो तुमच्यासारखाच छाती पुढ काढून चालूं लागेल. ”

रमेशनें त्याच क्षणीं काहीं उत्तर दिलें नाहीं.

चांदण्याच्या प्रकाशांत ओसडलेले आकाश पाहाण्यासाठीं त्याने खिडकीबाहेर पाहिलें. यापूर्वी कधींच ज्या भावनेचा परिचय झाला नाहीं अशी एक विलक्षण वेदना त्याच्या हृदयात उत्पन्न झाली. कितीतरी वेळ तो उगीच बसून राहिला होता. नंतर तोंड फिरवून तो म्हणाला, “ हें पहा, या असल्या भानगडींत मला गुंतवू नकोस. अनेक दुःखकष्ट भोगून कुठं अधुकसा प्रकाश मला दिसू लागला आहे. म्हणूनच मला भय वाटतं, कीं एव्हढ्याशा फुंकरीनं सुद्धा तो मावळला जाईल. ”

रमा म्हणाली, “ काहीं भीति नाहीं रमेशदादा, तो दिवा मालवायची. काकू म्हणाली, कीं दूर राहून उंचावरून काम करायला पहात होता तुम्ही, म्हणून ही संकटं उत्पन्न झाली. आता आमच्या दुष्कृत्यानं तुम्हाला ओढून आम्ही ठीक योग्य जागीं आणून बसवून ठेवलय. आता तुम्ही अगदीं आमच्यात येऊन मिसळला आहात म्हणून तुम्हाला भीति वाटते. पूर्वी या भीतीचा मागमूससुद्धां तुमच्या मनांत आला नसता. तेव्हा तुम्ही आम्हा गावढळ लोकांच्या आटोक्या-पलीकडे होतां. अगदीं आमच्यांतलेच झाला आहात म्हणूनच हा प्रकाश अधुक होणार नाही—रोज वाढत जाईल सारखा ! ”

काकूचें नांव ऐकतांच रमेश प्रफुल्लित होऊन म्हणाला, “ ही ज्योत आतां मालवणार नाहीं अस तुला निश्चितपणें वाटत का रमा ? ”

“ अगदीं निश्चितपणें वाटत. ” रमा ठासून म्हणाली, “ काकूनच तसं सागितलं. त्या सार काहीं जाणतात. हें तुमचच काम आहे. माझ्या यतीनला तुम्ही हाताशीं धरा. माझ्या अपराधाची मला क्षमा करा अन् आज मला असा आशीर्वाद देऊन निरोप द्या रमेशदादा, कीं मी निश्चित होऊन माझ्या मार्गाला लागेन.”

कडकडणाऱ्या मेघांप्रमाणें रमेशचे हृदय पुनः पुनः चमकून उठू लागले. पण तो मान खाली घालून स्तब्ध बसला होता.

रमा म्हणाली, “ आणखी एक माझ काम केलं पाहिजे तुम्ही. बोला होईल. ”

“ कोणतं काम ? ” रमेश हळूच म्हणाला.

माझी बाजू घेऊन तुम्ही बड्यादादाबरोबर कधीं झगडा करायचा नाही." रमा म्हणाली.

"म्हणजे काय ?" तिच्या भाषणाचा अर्थ न कळल्यामुळे रमेशने विचारले

"म्हणजे एव्हढच–" रमा म्हणाली," कधी तुम्हाला काही ऐकू आलं तर हें ध्यानांत ठेवा, कीं मी सार मुकाट्यान सहन करून गेले आहे. कसलाही वाद कधीं घातला नाहीं. एके दिवशी ज्यावेळीं मला अगदीं असह्य झाल त्यावेळीं काकू येऊन मला म्हणाली होती, 'पोरी, खोट्याची वाटाघाट करून जर त्याला जागवल तर त्याच आयुष्य वाढतं. स्वतःला सहन करता येत नाहीं म्हणून खोट्याच आयुष्य वाढवण्यासारखं पाप नाही.' तिचा हा उपदेश ऐकून मी सार दुःखदुर्भाग्य गिळून टाकल आहे !—हें देखील तुम्ही विसरूं नका बर रमेशदादा."

रमेश तिच्या तोंडाकडे नुसता पहात राहिला. रमा क्षणभराने म्हणाली, "आज मला क्षमा करवत नाहीं म्हणून वाईट वाटून घेऊं नका रमेशदादा. आज जें कठीण वाटतय तें उद्या सोप होऊन जाईल हें मला खात्रीन माहीत आहे. त्यावेळीं अगदीं सहज तुम्ही माझ्या अपराधाची क्षमा कराल.—उद्या मी जाणार !"

उद्यां ?

आश्चर्यचकित होऊन रमेशनें विचारलें, "उद्या कुठं जाणार ?"

"काकू जिथ घेऊन जातील तिथ." रमा म्हणाली.

"मी ऐकलय, कीं ती पुनः येणार नाहीं म्हणून." रमेश म्हणाला.

"मीही येणार नाहीं" रमा हळूहळू म्हणाली, "मीही कायमचा निरोप घेणार आहे तुमचा." असे म्हणून वाकून तिने मस्तक जमिनीवर ठेवलें.

कांहीं वेळ विचार करीत एक मोठा सुस्कारा सोडून रमेश उभा राहात म्हणाला, "ठीक आहे. जा. पण माझा निरोप का मागतेस ते नाही का सांगणार मला ?"

रमा उगीच राहिली.

रमेश पुनः म्हणाला, "साऱ्या हकिकती न सागता तू का निघून जातेयस ते तुझं तुलाच माहीत. पण मी अतःकरणपूर्वक देवाला आळवतों आहें, कीं मनापासून क्षमा करायची मला बुद्धि होऊं दे. तुझ्याविषयींचं किल्मिष माझ्या मनांतून जात नाहीं म्हणून मला किती यातना होत आहेत ते ईश्वरालाच माहीत!"

रमेच्या दोन्ही डोळ्यांतून सारखीं आसवे गळू लागलीं. त्या अंधुक प्रकाशांत रमेशाला तें दिसले नाहीं.

काहीच न बोलता रमा बाजूला गेली आणि पुन: एकदां तिनें त्याला प्रणाम केला. रमेशही खोलीबाहेर निघून गेला.

रस्त्याने जाताना त्याला वाटूं लागले, कीं पुढल्या काळात कर्तबगारी करून दाखवायचा उत्साह ढगाआड जाणाऱ्या चादण्यासारखाच झाकळला गेला.

दुसरे दिवशीं सकाळीं रमेश ज्यावेळीं त्या घरीं जाऊन पोंचला त्यावेळी विश्वेश्वरी निघून जाण्याच्या तयारीने मेण्यात बसत होती. मेण्याच्या दाराशी उभा राहून रमेश गहिवरल्या आवाजाने म्हणाला, " माझा काय अपराध झाला म्हणून एव्हढ्या लवकर आम्हाला टाकून निघालीस काकू ? "

आपला उजवा हात रमेशाच्या माथी राखून विश्वेश्वरी म्हणाली, " अपराधाच्या गोष्टी बोलायला गेल तर बोलण सपायचं नाहीं बाबा. नकोत त्या गोष्टी !"

त्यानतर ती म्हणाली, "जर मी इथ मेलं रमेश, तर वेणीचा हात लागेल माझ्या प्रेताला. तस झाल तर मला मुक्ति मिळणार नाही. या लोकीं मी जळत पिचत आयुष्य काढलं, परलोकी तरी तस जळायला पिचायला नको म्हणून इथून पळतेय रमेश."

एकदम धक्का बसल्यासारखा रमेश सुन्न होऊन उभा राहिला. आज या एकाच भाषणाने काकूच्या अत:करणातले ' आईचे हृदय ' त्याला जसे दिसून आले तसे आजवर कधीच दिसलें नव्हतें. काहीं वेळ स्वस्थ राहून तो म्हणाला, " रमा कां जातेय काकू. "

विश्वेश्वरीच्या तोंडून एक मोठा सुस्कारा निघत होता, तो तिने मोठ्या कष्टाने सावरला. एक आवढा गिळून ती म्हणाली, " या संसारात तिला जागा नाहीं बाबा, म्हणून तिला देवाच्या पायाजवळ घेऊन जाते आहें. तिथ जाऊन देखील ती बचावते की नाहीं ते पाह्यचं आहे. पण जर बचावली-तर या अतिशय कठीण अशा प्रश्नाची उकल करीत मला आयुष्य कंठावं लागेल. देवान एव्हढं रूप, एव्हढे गुण, एव्हढं मोठं हृदय देऊन या जगांत तिला का पाठवल आणि काहींसुद्धा दोष नसता एव्हढा मोठा दु:खाचा बोजा माथीं घेऊन का जगाबाहेर ढकलून दिलं ? यात देवाचा काहीं तसाच उद्देश आहे, कीं नुसता आमच्या या समाजाचा तो खेळ आहे ? अरे रमेश, तिच्यासारखा जळला पोळलेला जीव या उभ्या पृथ्वीवर सांपडायचा नाहीं बर—" बोलता बोलता तिचा गळा दाटून आला. साऱ्या आयुष्यात ती कधींच अशी व्याकूळ झालेली दिसून आली नव्हती.

रमेश उगीच राहिला. थोड्या वेळानें विश्वेश्वरी म्हणाली, " पण रमेश,

तिच्याबद्दल गैरसमज करून घेऊ नकोस, एव्हढच माझ तुला सागणं आहे. जायच्या वेळीं मी कुणावर दोषारोप करून जाणार नाहीं पण कधीं चुकूनसुद्धां तूं माझ्या या सागण्यावर अविश्वास करूं नकोस—तुझ्या कल्याणाची काळजी करणारी तिच्यासारखी दुसरी कुणी नाहीं. ”

“ पण काकू—” रमेश म्हणत होता.

त्याला थाबवून काकू बोलू लागली, “ त्यात पण बिण काहीं नाहीं रमेश. तू जे ऐकलंस ते सार खोट. जे जाणवल तुला, ते सार खोट. हे प्रकरण इथल्या इथच समाप्त झाल तू जें काम हातीं घेतल आहेस ते यशस्वी करायला सारा द्वेषमत्सर ओलाडून पूर्णपणे समर्थ हो, एव्हढाच तुला तिचा शेवटचा निरोप आहे. एवढ्यासाठींच ती तोंड दाबून सार सहन करीत होती. जीव द्यायला सरसावली रे रमेश, पण तोड उघडून बोलली नाहीं. ”

रमेच्या तोंडून गेल्या रात्रीं रमेशने जे चारदोन शब्द ऐकले होते ते या प्रसगीं त्याला आठवले, त्याला अनावर रडू येत होते पण तें त्याने दाठओठ खाऊन गिळले. जिवाचा आटापेटा करून खाली मान घालून त्यानें बोलून टाकले, “ मी तसाच वागेन अस तिला साग काकू ! ” असे म्हणून हात पुढें करून त्याने कसा बसा तिच्या पायाना स्पर्श करून प्रणाम केला—

—आणि तो तडक तिथून निघून गेला.

